॥ ३ ॥

# विचारवंताचे कार्य व मर्यादा

प्रदीप प्र. गोखले

अन्न, वस्त्र, निवाऱ्याची माणसाला गरज असते, पण अन्न व निवाऱ्याची गरज पशूंनाही असते आणि वस्त्राची जी गरज माणसांना असते तिचे हेतू दोन प्रकारचे असतात. एक, थंडी–ऊन–पावसापासून रक्षण आणि दोन, लज्जारक्षण. पैकी थंडी ऊन पावसापासून मनुष्येतर प्राणीही स्वतःचे रक्षण करतात ते त्यांना मिळालेल्या जाड त्वचा, केस यासारख्या नैसर्गिक शरीरसंपदेमुळे व त्यांच्या स्वसंरक्षणपर उपजत प्रवृत्तींमुळे. लज्जारक्षणार्थ वस्त्र धारण करणें हे माणसाचे एक सांस्कृतिक वैशिष्ट्य मानता येईल. पण माणसाचे माणूसपण एवढ्यावर पूर्ण होत नाही. कारण माण–साला जशी अन्नवस्त्रनिवाऱ्याची गरज असते तशी मार्गदर्शक विचाराचीही असते. मनुष्येतर प्राण्यांचे जीवन त्यांच्या सहजप्रवृत्तींनी नियंत्रित झालेले असते. त्या जीव–नाला आपण काही वळण द्यावे, सहजप्रवृत्तीतून जे मिळते त्यापेक्षा वेगळे श्रेयप्रेय मिळवावे अशी प्रेरणा त्यांच्यात नसते. तशी प्रेरणा माणसांत असते. अन्नवस्त्र–निवाऱ्याची गरजसुद्धा कशी भागवायची हे तो सहजप्रवृत्तीनीच न ठरवता भल्याबुऱ्या विचारांनी (त्यातच रसिकवृत्तीचा विचारही आला) ठरवतो. आणि अन्नवस्त्रनिवा–ऱ्याहून वेगळ्या गरजांची निर्मिती आणि गरजांची पूर्तताही तो विचाराने करतो. हे करताचा त्याला ज्या समस्यांना आणि संकटांना तोंड द्यावे लागते, त्यांनाही तो केवळ सहजप्रवृत्तींनी तोंड देत नाही, देऊ शकत नाही. त्यासाठी त्याला मार्गदर्शक विचा–रांची गरज पडते. विचारांनीच त्याला परिस्थितून मार्ग काढावा लागतो. यातूनच 'विचार करणारा प्राणी' ही माणसाची व्याख्या त्याच्या एका मध्यवर्ती वैशिष्ट्यावर

प्रकाश टाकणारी ठरते.

विचार हा अनेक प्रकारचा असतो आणि विचारांची कार्येही पुष्कळ असतात. विचारांनी माणूस अनुभवाचा अर्थ लावतो. पूर्वीच्या अनुभवांची आणि आताच्या अनुभवांची सांधेजोड करतो. विविध अनुभवांमध्ये संबंध जोडून एक व्यवस्था तयार करतो. वेगवेगळ्या संभाव्यतांची कल्पना करतो, संकल्पांचे मनोरे रचतो. नवीन अनुभवांची निर्मिती करतो. साऱ्या जगाला जणू एक करण्याचे काम विचार करतो आणि जगातील घटकांना एकमेकापासून आणि स्वत:पासून अलग करण्याचे कामही विचार करतो. अविचार हाही एक प्रकारचा विचारच असतो आणि तोही माणूसच करु शकतो. माणूस हा अशा प्रकारे विचार करणारा प्राणी असला तरी प्रत्येक माणसाला आपण विचारवंत म्हणत नाही. विचारवंत म्हणजे केवळ विचार करणारा नाही. विचार करणारे आपण सर्वच असतो. पण आपण बहुतेकजण जो विचार करतो तो आपला, आपल्यासाठी, आपल्यापुरता असतो. किंवा या विचारांची व्याप्ती वाढवून आपण आप्तस्वकीयांचा–कुटुंबीयांचा, नातेवाईकांचा, हितसंबंधीयांचा, स्वजातीयांचा विचार करतो. याउलट विचारातली 'स्वनिष्ठा', 'स्वकीयनिष्ठा' कमी करुन विचार वस्तुनिष्ठपणे, व्यापकपणे, सार्वत्रिकपणे करणारा व मांडणारा विचारवंत ठरतो. अशा विचारवंताला समाजात महत्वाचे स्थान दिले गेले पाहिजे ते अनेक कारणांसाठी.

एकतर सार्वजनिक हित म्हणजे व्यक्तिगत हितांची गोळाबेरीज नव्हे. प्रत्येकाने आपापले हितसंबंध सांभाळले म्हणजे एकूण समाजाचे हितसंबंध सांभाळले जातीलच असे काहीवेळा गृहीत धरले जाते. पण स्वत:च्या हितसंबंधांचा विचार करणारा माणूस दुसऱ्याच्या हितसंबंधांचे भान ठेवतो असे नाही. त्याने भान ठेवले तरी त्याचे त्याला आकलन होते असे नाही. आकलन झाले तरी दुसऱ्याचेही हितसंबंध आपण सांभाळले पाहिजेत, एकूण सार्वजनिक हिताला पूरक असेच आपले वागणे असले पाहिजे अशी प्रेरणा त्याला मिळते असे नाही. हे भान, हे आकलन, ही प्रेरणा ज्या विचारांतून मिळते असे विचार देण्याचे काम विचारवंत करीत असतात. निदान त्यांच्याकडून तशी अपेक्षा असते.

विचारांचे कार्य बहुविध असल्याने विचारवंतांचेही कार्य बहुविध असते. वस्तुस्थितीचे सर्वसामान्य माणसाला झालेले आकलन बऱ्याचदा पूर्वग्रहधूसर असते. पिढ्यानूपिढ्यांच्या संस्कारातून, श्रद्धेतून तयार झालेल्या आकलनाची चिकित्सा करायला तो तयार नसतो. त्याच्या या आकलनाची चिकित्सा करण्याचे व त्याला स्वयंचिकित्सेला प्रवृत्त करण्याचे काम विचारवंत करतो. श्रद्धांनी व पूर्वग्रहांनी धूसर झालेल्या आकलनाचे सत्यशोधकीवृत्तीने परीक्षण करणें हे विचारवंताचे एक प्रकारचे कार्य झाले. पण विचारवंत नेहमी श्रद्धाविरोधी भूमिका घेतो असे नाही. काही वेळा तो काही श्रद्धांचे

समर्थनही करील. तिथे सत्यशोधकी दृष्टीपेक्षा कोणत्या श्रद्धा समाजहिताच्या आहेत, कोणत्या श्रद्धा हितविरोधी आहेत यांचा विचार विचारवंत करील. पण सत्यशोधकी वृत्ती असो की हितचिंतकाची भूमिका असो, या दोन्हीमधे व्यक्तिगत, संकुचित दृष्टि-कोनापलिकडे जाण्याची व्यापक, सार्वजनिक, सार्वत्रिक बनण्याशी वृत्ती मुख्य असते. समाजाला भेडसावणाऱ्या विविध समस्यांचे आकलन एका व्यापक चौकटीत करुन घेऊन परिस्थितीच्या गुंत्यातून वाट काढण्याचा वैचारिक प्रयत्न विचारवंत करतो. अर्थात हे सारे विचारवंताने विचारांच्या पातळीवर, विचाराच्या माध्यमातून करायचे असते. आणि यातूनच विचारवंताच्या भूमिकेतील मर्यादा स्पष्ट होतात.

(१) विचारवंत हा वैचारिक पातळीवर व्यापक आणि मोठा ठरला तरी काही वेळा एक व्यक्ती म्हणून तो संकुचित आणि छोटाच असतो. व्यक्तिगत जीव-नात जात, नातीगोती, धर्मश्रद्धा, व्यक्तिगत महत्त्वकांक्षा, स्वार्थ यांच्यात तो बंदिस्त असू शकतो. असा माणूस विचारांतून जे आदर्श मांडतो ते स्वतःच्या जीवनात साकार करत नाही. सामान्य माणसे विचारवंतामधे स्वतःचा आदर्श शोधतात आणि फसतात.

(२) विचारवंताच्या व्यक्ती म्हणून असलेल्या मर्यादा काही वेळा त्याच्या वैचारिक भूमिकेतही प्रकट होताना दिसतात व त्यामुळे 'विचारवंत' म्हणूनही त्या त्याच्या मर्यादा ठरतात. एखाद्या जातीत किंवा संप्रदायात जन्माला आलेला एखादा विचारवंत आपल्या जातीतील किंवा संप्रदायातील थोर माणसांचे, संतांचे गुणगान करतो. इतर संप्रदायांत तेवढ्याच तोलामोलाची माणसे असली तरी त्यांना तो तेवढे महत्त्व देत नाही. यातून तो दोन गोष्टी मिळवतो. विचारवंत म्हणूनही मिरवतो आणि सांप्रदायिक म्हणूनही प्रतिष्ठा मिळवतो. यातून 'सांप्रदायिक विचारवंत' तयार होतात. संप्रदायाच्या मर्यादा या त्या विचारवंताच्याही मर्यादा होतात.

(३) विचारवंताचा संबंध विचार मांडण्याशी, भाषिक व्यवहारांशी येत असतो. भाषेवर प्रभुत्व असेल, वक्तृत्वहौशी असेल तर तो प्रसिद्ध विचारवंत बनतो. पण स्वतःच्या जीवनानुभवांशी पडताळा घेण्याचे तसेच तर्काच्या कसोटीवर विचार घासून पाहण्याचे कष्ट तो घेतोच असे नाही. असे 'सुप्रसिद्ध विचारवंत' कठोर विचार मांडण्याचे टाळतात आणि बऱ्याचदा लोकांचे पूर्वग्रह सुखावण्याचे कार्य करतात. असे काही विचारवंत ज्या व्यासपीठाकडून त्यांना निमंत्रण येईल त्या व्यासपीठाला अनुरुप विचार मांडून लोकमान्यता मिळवतात.

(४) विचारवंतामधील 'माणूस' हा विशिष्ट विकारांच्या अधीन असेल तर तो त्यानुसार स्वतःच्या विकारांना अनुसरुन विचारनिर्मिती करतो. तो अर्थलुब्ध असेल तर जिथून पैसा मिळेल, त्या संस्थेला, संघटनेला, संप्रदायाला तो वैचारिक पाठबळ देतो. व्यसनी असेल तर व्यसनपूर्ती करणाऱ्या व्यक्तीच्या किंवा संस्थेच्या समर्थनार्थ

आपले विचारसामर्थ्य वापरतो.

(५) विचारवंत एक सार्वत्रिकतेची, व्यापक दृष्टिकोनाची चौकट स्वीकारतो किंवा तसा दावा करतो. या चौकटीत विचार मांडायचे तर ते अमूर्त संकल्पनांच्या आधारे व पारिभाषिक संज्ञांच्या आधारेच मांडावे लागतील असे काही विचारवंतांना वाटते. त्यातून त्यांची मांडणी दुर्बोध होते. त्यांना चांगलासा भाष्यकार मिळाला तर ठीक नाही तर त्यांचे विचार लोकांपर्यंत नीट पोहचू शकत नाहीत व विचारांतून लोकांना मार्गदर्शन करण्याचे कार्य असे विचारवंत करु शकत नाहीत.

तेव्हा एका बाजूने विचारवंतांना समाजात महत्त्वाचे स्थान असले पाहिजे कारण व्यापक विचार करणारे, समाजाला मार्गदर्शन करणारे लोक नेहमीच मोक्याच्या जागी असावे लागतात. पण त्याचबरोबर विचारवंतांवर मोठी जबाबदारीही येते. विचारवंत हा व्यक्ती म्हणून येणाऱ्या मर्यादांवर तसेच विचारवंत म्हणून येणाऱ्या मर्यादांवर ज्या प्रमाणात मात करेल, त्याप्रमाणात तो ही जबाबदारी चांगल्याप्रकारे पार पाडेल.

***



॥ ४ ॥

# यः क्रियावान स पंडितः।

ग. प्र. प्रधान

विचारवंत हा शब्द अलीकडे काहीशा ढिलेपणाने वापरला जातो, असे मला वाटते. विचारवंतांच्या विविध श्रेणी आहेत आणि या सर्वांना सरसकट एकाच वर्गात गोवणे इष्ट नाही. शब्द हे रेखिवपणे, अर्थाची छटा लक्षात घेऊन वापरले जावेत असा माझा आग्रह आहे.

या विश्वाचे रहस्य काय आहे, विश्वाच्या या पसाऱ्यात माणसाचे नेमके स्थान कोणते याचा विचार जे करतात ते तत्त्वज्ञ असतात. हे अत्युच्च श्रेणीतील विचारवंत असतात. आपल्या कडील उपनिषकार, तसेच पाश्चात्त्य देशातील प्लेटो, कांट, बर्गसाँ, हे तत्त्वज्ञ होत. धर्मविचार मांडणारे द्रष्टे (प्रॉफेट्स्) यांचा वेगळा वर्ग असतो. ख्रिस्त, बुद्ध, महंमद पैगंबर हे असे द्रष्टे होते. काही विचारवंत या द्रष्टयांनी मांडलेल्या विचारांवर किंवा 'भगवद्गीते' सारख्या धर्मग्रंथावर भाष्य करताना स्वतःचा दृष्टिकोन मांडतात लो. टिळकांनी 'गीतारहस्या' मध्ये भगवद्गीतेवर भाष्य करताना 'निष्काम कर्मयोग' हाच गीतेचा संदेश आहे असे सांगितले आहे. काही तत्त्वचिंतक जीवनाच्या सर्व कालीन महत्त्वाच्या समस्या आणि त्याचबरोबर त्यांच्या काळातील महत्त्वाच्या सामाजिक समस्या यांचे विश्लेषण करुन त्यांच्यासंबंधी स्वतःचा दृष्टिकोन मांडतात. बर्ट्राण्ड रसेल यांनी हे केले आहे. या सर्व व्यक्तींच्या विचारामुळे मानवी जीवन संपन्न झाले आहे.

असामान्य प्रज्ञा सर्वांच्याच वाटयाला येत नाही. परंतु अनेक जण बुद्धिमान असतात. ते दीर्घकाळ वाचन करतात, व्यासंग करतात आणि ज्ञानोपासनेमुळे बुद्धि

आणि मन परिपक्व झाल्यावर मानवी संबंधी किंवा त्यांच्या काळातील व समाजातील राजकीय, सामाजिक वा आर्थिक समस्यांसंबंधी आपले विचार मांडतात. त्यांचे विश्लेषण मार्मिक असते आणि त्यांचा दृष्टीकोन स्वतंत्र असतो. म. ज्योतिबा फुले, आगरकर, डॉ. श्रीधर व्यंकटेश केतकर, डॉ. बाबासाहेब आंबेडकर हे असे विचारवंत होते. यांच्या पैकी म. फुले आणि डॉ. आंबेडकर हे कृतिशील विचारवंत होते.

यांच्यापेक्षा विचारवंतांचा आणखी एक वर्ग असतो. या वर्गातील व्यक्ती बुद्धिमान असतात आणि ज्ञानोपासकही असतात. अनेक विषयांवर आपले विचार मांडताना हे विचारवंत कोठल्याही पंथाची वा पक्षाची बांधिलकी पत्करत नाहीत. त्यांची भूमिका स्वतंत्र असते आणि त्यामुळे विचार लोकांना उद्‌बोधक वाटतात. याच बरोबर आचार्य जावडेकर यांच्या सारखा एखादा विचारवंत स्वातंत्र्य चळवळीत भाग घेतांना गांधीजींच्या विचारांचे महत्व सांगतांना त्याला समाजवादासारख्या विचारांची जोड द्यावयास हवी अशी भूमिका मांडतो. त्यांचेही विचार राजकारणातील विचारमंथनास गती देणारे असतात. दि. के. बेडेकर यांनी त्यांच्या उत्तरायुष्यात जे धर्मविषयक चिंतन आणि साहित्य व अन्य प्रश्नांसंबंधींचे विचार मांडले तेही अत्यंत अभिनव होते. विठ्ठल रासजी शिंदे, वामन मल्हार जोशी, लक्ष्मण शास्त्री जोशी हे या वर्गातील विचारवंत होते.

अभ्यासाचा एखादा खास विषय निवडून त्याचा दीर्घ काल व्यासंग करुन, पूर्वी त्या विषयासंबंधी जे विचार मांडले गेले त्याचे विश्लेषण आणि विवेचन करणारे काही प्राध्यापक असतात. त्यांचे विचारही महत्वाचे असतात. प्रत्यक्ष चळवळीत सामील न झाल्यामुळे, अनेक प्रश्नासंबंधी मांडल्या गेलेल्या दृष्टिकोनांचे ते तटस्थपणे विश्लेषण करतात. हेही महत्वाचे असते परंतु त्यांच्या विचारांना काही बाबतीत मर्यादा पडते. बौद्धिक पातळीवर उत्तम विवेचन करणाऱ्या या विद्वान मंडळींना समाजजीवनातील विविध प्रवाहांची ओळख नसल्यामुळे त्यांचे विवेचन काहीसे पुस्तकी होते. या वर्गातील काही जणांना आपल्या विचारातील ही मर्यादा जाणवते आणि ती दूर करण्यासाठी ते समाजातील चळवळींमध्ये सहभागी होऊ लागतात. हे करतांना त्यांच्या लक्षात येते की ग्रंथ महत्वाचे असतातच परंतु जीवनाचा ग्रंथ वाचला नाही, अनुभव घेऊन स्वतःचे मन समृद्ध केले नाही, तर केवळ ग्रंथांचे वाचन अपुरे पडते. अशा व्यक्तींच्या जीवनात एक नवी प्रक्रिया सुरु होते. त्यांनी वाचन केलेल्या ग्रंथातून त्यांना जे सत्य गवसले ते सत्य वस्तुस्थितीच्या आधाराने पारखू लागतात. हे करतांना ते पूर्वीच्या आपल्या विचारांना काही मुरड घालतात. अनुभवानंतर जे सत्य गवसले असे त्यांना वाटते, ते संपूर्ण सत्य आहे का हे पारखून घेण्यासाठी ते आणखी वाचन करतात आणि अन्य विचारवंताशी चर्चा करतात. यामुळे वाचन–कृती–वाचन–कृती अशी त्यांची सत्यशोधनाची प्रक्रिया चालू राहते. प्रत्यक्ष सामाजिक काम करतांना

झालेल्या समाज जीवनाच्या दर्शनामुळे त्यांच्या विचारांना ताजेपणा येतो आणि सतत वाचन केल्यामुळे, चळवळीत भाग घेताना निर्माण होणारा अभिनिवेश, अहंकार हे ही कमी होऊ लागतात. अशा व्यक्तींच्या संदर्भातच 'यः क्रियावान स पंडितः।' हे विधान केलेले आहे. हे विचारवंत तत्त्वज्ञ नसतात, त्यांच्याजवळ स्वयं प्रज्ञा असतेच असे नाही. परंतु आपल्या हातून ज्ञानपूर्ण कर्म व्हावे या त्यांच्या मनातील उर्मीमुळे हे ज्या वेळी आपले विचार मांडतात त्यावेळी त्यामध्ये प्रामाणिकपणा व स्पष्टपणां येतो. एका अर्थाने थोर विचारवंतांचे ते भाष्यकार असतात, परंतु हे भाष्य केवळ बौद्धिक भाष्य नसते. मर्यादित अर्थाने ते जीवनभाष्यच असते. असा कृतिशील विचारवंतांचा वर्ग ज्या समाजात वाढत जातो, तेथे अनेक चळवळी निर्माण होतात आणि नवनवीन कार्यंर्ते या चळवळींच्याकडे आकृष्ट होतात. नानासाहेब गोरे यांच्या बरोबर दीर्घ काळ काम करतांना मला त्यांच्या जीवनातील कृती व विचार यांचा परस्परावर परिणाम (इंटर अॅक्शन) सतत जाणवला. मेधा पाटकर यांची भाषणे ऐकतांना मला हाच प्रत्यय आला. तत्त्वज्ञ, तत्त्वचिंतक आणि स्वतंत्र प्रज्ञेचे विचारवंत यांच्याबद्दल माझ्या मनात नितांत आदर आहे, कारण त्यांच्या विचारातून अनेकांच्या कृतीला प्रेरणा मिळते. त्याच बरोबर राजकीय आणि सामाजिक चळवळींना कृतिशील कशी विचारवंत गती देतात हे ही मी पाहिले आहे आणि त्यामुळेच या 'क्रियावान पंडितां'च्या बद्दल माझ्या मनात आदर आहे आणि आपुलकी व प्रेमही आहे.

***



# सामाजिक जीवनात विचारवंतांचे कार्य

प्रा. नागोराव कुंभार

विचारवंत हा समाजातील अतिशय महत्त्वाचा घटक आहे. विचारवंताच्या सहभागाशिवाय सामाजिक विकास आणि सामाजिक परिवर्तन होत नाही. त्यांच्या बौद्धिक परिश्रमातून मूलगामी समाजपरिवर्तनाचा व चांगल्या समाजाचा संकल्पनात्मक वा तात्त्विक आराखडा तयार होतो. त्यांचे विचार सामाजिक परिवर्तन वा क्रांतीला इंधनाप्रमाणें साह्यभूत ठरतात. यामुळे विचारवंतांचे कार्य समाजाला उपयुक्त व मार्गदर्शक स्वरुपाचे असते.

समाजातील प्रत्येक बुद्धिजीवी किंवा सुशिक्षित व्यक्तीला विचारवंत म्हणता येणार नाही. ज्ञानावर प्रेम असणारी, ज्ञान प्रक्रियेत रममान होणारी, ज्ञानाचे संवर्धन व संक्रमण करणारी, सृजनशील विचार व कल्पनांचा विकास करणारी, विविध विचार आणि विचारधारांचा खुल्या मनाने चिकित्सा करणारी, पूर्वगृहमुक्त, निःपक्ष व निर्भिडपणें विचार मांडणारी व्यक्ती म्हणजे विचारवंत होय. अशा विचारवंत व्यक्तीचे विचाराच्या क्षेत्रांतील योगदान समाजाला प्रत्यक्ष व अप्रत्यक्षरीत्या उपयुक्त असते.

## विचारवंताचे महत्त्व

विचारवंताचे समाजात महत्त्वाचे स्थान असते. कारण ते नवविचार व नव मूल्यनिर्मितीचे शक्ती केंद्र असतात. त्याच्यामुळे समाजात विचारधन निर्माण होते. केवळ भौतिक विकासाने नव्हे तर सकस विचारधनामुळे समाजाची प्रगती होत असते. विचारवंतांनी शोधून काढलेल्या विचार, मूल्य व तत्त्वामुळे समाजातील साहित्य,

कला, शास्त्र आणि तंत्रज्ञान यांचा विकास होतो. समाजाची संस्कृती विकसित होते.

विचारवंत समाजाचे वैचारिक आणि सांस्कृतिक नेतृत्व करतात. त्यांच्यामुळे समाजाच्या भूत, वर्तमान आणि भविष्य काळाचा सांधा जोडला जातो. ते व्यक्ती व समाजाला एक स्पष्ट वैचारिक दृष्टिकोन देत असतात. त्यांच्या विचारामुळे व्यक्ती आणि समाजाच्या सामाजिक, राजकीय, आर्थिक आणि सांस्कृतिक दृष्टिकोनात बदल होत असतो. समाजातील लोकमत घडविण्यात त्यांचा सिंहाचा वाटा असतो. त्यांच्या विचारांचा समाजातील निरनिराळ्या सामाजिक, राजकीय, आर्थिक, सांस्कृतिक चळ-वळींवर प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षरीत्या खोलवर व दूरगामी परिणाम होत असतो. विचारवंत हे अभ्यासू, विशिष्ट विषयातील तज्ज्ञ, निःस्वार्थी व तटस्थतेने व वस्तुनिष्ठ पद्धतीने विचार मांडणारे असतात म्हणून सर्वसामान्य माणूस त्यांचे विचार ग्राह्य समजून जशाच्या तसे चिकित्सा न करता स्वीकारीत असतो. ते खऱ्या अर्थाने व्यक्ती व समाज जीवनाचे शिल्पकार वा इंजिनिअर्स असतात.

यास्तव विचारवंतांनी आपल्या क्षेत्राची प्रतिष्ठा राखली पाहिजे. त्यांनी आपले विचारस्वातंत्र्य टिकविले पाहिजे. त्यांनी सत्ता, संपत्ती वा एखाद्या पदाच्या मोहास बळी न पडता आपले विचार अगदी स्पष्ट मांडले पाहिजेत. विचारवंतांनी विशिष्ट वर्ण, वर्ग, जात वा वंश यांचे हितसंबंध जोपासणारे संकुचित वा एकांगी विचार मांडता कामा नये. त्यांनी पारंपारिक व कालबाह्य मूल्यव्यवस्थेच्या मान-सिक जोखडातून मुक्त होऊन सर्वांच्या हितासाठी विचार मांडले पाहिजेत. त्यांनी मानवाचे शोषण करणाऱ्या सरंजमशाही व भांडवलशाही व्यवस्थेची वा प्रस्थापितांची भाटगिरी व भलावण करता कामा नये. विचारवंतांनी स्वार्थीवृत्ती व स्वकेंद्रितता यांना मूठमाती देऊन सत्यनिष्ठा व प्रामाणिकपणाची वृत्ती धारण करुन समाज बदला-साठी आपली लेखणी वापरली पाहिजे. तलवारीपेक्षा लेखणीत अधिक शक्ती असते याचे भान ठेवून विचारवंतांनी विचारमंथनाचे काम केले पाहिजे.

## वैचारिक मार्गदर्शन

विचारवंतांनी व्यक्तीला योग्य वैचारिक मार्गदर्शन केले पाहिजे. सुयोग्य विचाराच्या संस्कारामुळे व्यक्तीची विचार करण्याची क्षमता व गुणवत्ता वाढते. ती बौद्धिकदृष्ट्या परिपक्व व परिपूर्ण होते. तिच्या मनाचा व बुद्धीचा समतोल व सर्वांगिण विकास होतो. तिची विवेकशक्ती विकसित होते. योग्य विचारामुळे व्यक्तीच्या विचार आणि आचाराला योग्य वळण लागते. त्यामुळे व्यक्तीला ज्ञान, माहिती, शहाणपण, कौशल्य आणि तज्ज्ञता प्राप्त होते. व्यक्तीला जीवनावश्यक प्रेरणा मिळतात, व्यक्तीच्या नैतिक गुणाचा विकास होतो. तिच्या चारित्र्याची जडणघडण होते. योग्य विचार व्यक्तीला स्वतःच्या चारित्र्याचे संरक्षण करण्यासाठी ढालीसारखे उप-योगी पडतात. योग्य विचारांमुळे व्यक्तीला तिच्या जीवनात उद्भवणाऱ्या विविध

आव्हान आणि संकटांवर मात करण्यासाठी आवश्यक असलेला आत्मविश्वास व निर्भ-यता प्राप्त होते. यामुळे विचारवंतांनी व्यक्तीला योग्य विचारांसंबंधी सतत मार्गदर्शन केले पाहिजे.

विचारवंत मानवी मूल्यांचे पालक असतात. मूल्य म्हणजे अशी सार्वत्रिक तत्त्वे की जी प्राधान्यपूर्वक सर्वांनी स्वीकारलेली असतात आणि मानवी जीवनातील विविध घटनांची योग्यायोग्यता निश्चित करणारी मानदंड असतात. त्यांच्या अंमल-बजावणीतून व्यक्तीचा सर्वांगिण विकास व समाजाची प्रगती होते. त्यांच्यामुळे चांगला समाज निर्माण करणे शक्य होते. मुल्यांच्या अभावी मानवी जीवन दुभंगते संस्कृतीचा ऱ्हास होतो. नव–संस्कृतीनिर्मिती व संवर्धनाची प्रक्रिया थांबते. यामुळे मानवी जीवनात मूल्यांना फार महत्त्वाचे स्थान असते.

शिक्षणातून मूल्याचे संस्कार, संवर्धन आणि संरक्षण व्हावे असे अभिप्रेत असते परंतु आजचे शिक्षण यात अयशस्वी झाले. यास्तव विचारवंतांनी या क्षेत्रात मुद्दाम लक्ष देऊन कार्य करण्याची आवश्यकता आहे. त्यांनी स्वातंत्र्य, समता, बंधुता मानवी ऐक्य, न्याय, सहिष्णुता, सहकार्य, सुरक्षितता, शांतता, आदी मानवी मूल्यांचे संरक्षण, समर्थन आणि अभिसरण केले पाहिजे. त्यांना या मूल्यांविषयी मानवी मनात आदरभाव निर्माण करावा लागतो. या मूल्यानुकूल व्यक्ती व समाजमन घड-विण्याची जबावदारी त्यांच्यावर असते.

आज विचारवंत ही मानवी मूल्ये समाजात रुजविण्यात कमी पडत आहे त्यामुळे जुन्या आणि नव्या मूल्यांतील अंतर वाढत आहे. यामुळे मानवी जीवनातून कर्तव्य भावना, व्यक्तिप्रतिष्ठा, शिस्त, मानवी संबंधातील भावनिक ओलावा नष्ट होत आहे. या उलट सर्वत्र हिंसा, क्रूरता, समाजविघातक वृत्ती, भोगवाद, स्वार्थ वाढत आहे. यास्तव सुसंस्कृत मानवी जीवन निर्माण करण्यासाठी, नवी संस्कृती व समाजव्यवस्था निर्मितीसाठी, शांततामय. सुरक्षित व समाधानी मानवी जीवन निर्माण करण्यासाठी विचारवंताना एखाद्या पालकाच्या भूमिकेतून मूल्यांचे संरक्षण करावे लागते.

## संस्कृतीची चिकित्सा

विचारवंतांनी व्यक्तीला योग्य वैचारिक मार्गदर्शन केले पाहिजे. सर्वसामान्य माणसात ही चिकित्सा करण्याची बौद्धिक कुवत नाही. यास्तव विचारवंतांनी समा-जातील रुढी, परंपरा, धर्म, मूल्यव्यवस्था, तत्त्वज्ञान, आदी संस्कृतीच्या अंगांचे परखडरीत्या परिक्षण व चिकित्सा केली पाहिजे. चिकित्सेमुळे संस्कृतीतील गुण–दोषांची माहिती होते. यामुळे संस्कृतीतील कालबाह्य व कालसंगत काय ते कळते. चिकित्से-मुळे संस्कृतीतील कालबाहय व समाज प्रगतीला मारक बाबी फेकून देऊन जीर्ण विचार परंपरा तोडणे शक्य होते. संस्कृती चिकित्सा थांबली तर समाजातील गतिशीलता

थांवते व समाज स्थितीवादी वनतो. स्थितीवादामुळे समाजपरिवर्तन अशक्य होते. समाजात अनेक सामाजिक दोष निर्माण होतात. समाजाची प्रगतीच खुंटते, समाजाची अधोगतीकडे वाटचाल सुरु होते. चिकित्सेअभावी मानवी जीवनाचे भरुन न निघणारे सर्व क्षेत्रात नुकसान होते. यास्तव विचारवंतांनी अनुभव व बुद्धिवादाच्या साहाय्याने संस्कृतीची बदलत्या परिस्थितीप्रमाणे सतत चिकित्सा करणे समाजोन्नतीसाठी आवश्यक असते.

समाजातील संकुचित विचार आणि वृत्ती समाज प्रगतीच्या मार्गातील गतिरोधके असतात. आज सर्वत्र संकुचित वृत्ती फैलावत आहे व अनेक चळवळी व आंदोलने आणि संघटनांचा आधार होऊ पाहत आहेत. यास्तव विचारवंतांनी सर्व शक्तिनिशी प्रांत, भाषा, वंश, जात आणि धर्मवाद आदी संकुचित विचार व वृत्तींना विरोध केला पाहिजे. यातील फोलपणा आणि धोका समाजाला दाखवून देण्याचे काम विचारवंतांना करावे लागते. संकुचित विचाराप्रमाणे स्वार्थीवृत्ती, भोगवाद, हिंसाचार, दहशतवाद, पूर्वग्रह, अप्रामाणिकपणा, अनादरवृत्ती, शोषण, दारिद्र्य, विषमता, भ्रष्टाचार, लाचलुचपत, आळस, अन्याय, अत्याचार आदी सामाजिक वैगुण्येही वाढत आहेत. या संकुचित विचार व सामाजिक वैगुण्यामुळे मानवी जीवनाचा व संस्कृतीचा पायाच आज उद्ध्वस्त होतो की काय, अशी भीती वाटते. विचारवंतांनी समाजात ऐक्यभावना, सेवावृत्ती, निःस्वार्थ आणि वैश्विक दृष्टिकोन विकसित केल्यास या अराजकसदृश परिस्थितीवर आपणास मात करणे शक्य होईल, यास्तव विचारवंतांनी स्वतःला संकुचित विचारातून मुक्त करुन समाजाला दोषमुक्त करावे.

विचारवंत व्यासंगी असला पाहिजे, त्यांनी आपल्या विषयातील अद्यावत ज्ञान संपादन करुन त्यात प्रभुत्व संपादन केले पाहिजे. त्यांनी आपल्या विषयातील ज्ञानाची उसनवारी करण्याची प्रवृत्ती सोडून त्या विषयात स्वतंत्र चिंतनद्वारा ज्ञानात स्वावलंबी झाले पाहिजे. त्यांचे हे ज्ञानातील स्वावलंबन सखोल अभ्यास व स्वतंत्र चिंतनशिलतेशिवाय अशक्य असते. यास्तव विचारवंतांनी सर्वसामान्यांच्या ज्वलंत आणि मूलगामी समस्या, त्यांच्या आशा-आकांक्षा याचा सत्यान्वेषी पद्धतीने अभ्यास करुन त्यांची सुव्यवस्थितपणे मांडणी केली पाहिजे. त्यांनी या समस्या केवळ व्यवस्थितपणें उलगडून न दाखवता त्यांची उत्तरेही शोधून काढली पाहिजेत. त्या समस्यामागची अंगे व उपआंगे रेखीवपणे मांडत त्यामागील मुख्य तत्त्वांचा शोध घेतला पाहिजे. विचारवंतांनी वस्तुनिष्ठ अभ्यासाअंती काढलेले निष्कर्ष समाज वा शासनाच्या रागा-लोभाचा विचार न करता निर्भयपणे मांडले पाहिजेत, कारण त्या निष्कर्षांचा समाजाच्या त्रुटी, समाजातील विविध दोष आणि वैगुण्य समजण्यास व नवी धोरणे आखण्यासाठी उपयोग होतो, त्यातून समाजाला जागे करणे शक्य होते. सखोल

अभ्यासामुळे जटील समस्या सुटू शकतात. यास्तव त्यांनी सखोल अभ्यास करुन समाजाचे खरे व भ्रामक प्रश्न कोणते ते सांगणे आवश्यक आहे.

विचारवंतांना आपण विचारमंथन कशासाठी करीत आहोत याविषयी स्पष्ट कल्पना असली पाहिजे. त्यांचे विचारमंथन समाजाला उपयोगी पडणारे असावे लागते, त्यांनी मांडलेले विचार मूर्त स्वरुपात साकारण्यासाठी व लोकांपर्यंत पोहोचण्यासाठी त्यांना समाजप्रबोधनाचे कार्य करावे लागते. विचारवंत हा समाज प्रबोधनकारही असतो. समाजप्रबोधनाचे जनसमुहात हे कार्य करण्यासाठी त्यांना जनसमुहात जाऊन त्याच्याशी संवाद साधावा लागतो, त्याद्वारा लोकशिक्षण होते. या लोकशिक्षणातून लोकांत जाणीवजागृती होते. त्यातून प्रबोधनाची प्रक्रिया गतिशील होते. यास्तव विचारवंतांनी मूलगामी विचार तर मांडावाच परंतु त्याचबरोबर या विचारानुकूल असे समाजात बौद्धिक वातावरण तयार करावे. लोकांना नवा वैचारिक दृष्टिकोन द्यावा, जुना दृष्टिकोन फेकून देण्यास सांगावे, व्यक्ती व समाजाची पुरोगामी विचाराधिष्ठित समाजपरिवर्तनासाठी आवश्यक असलेली मानसिक तयारी करुन घ्यावी. परिवर्तनवादी चळवळी आणि जनआंदोलनांना वैचारिक आधार देऊन सर्वत्र त्याचे समर्थन करावे. त्यांनी समाजातील ज्वलंत समस्या व घटनांसंबंधी स्वतःचे तयार झालेले मत वाटेल ती किंमत देऊन मौन धारण न करता स्पष्टपणे मांडावे.

***



॥ ६ ॥

# विचारवंताची सामाजातील भूमिका

य. ज. महाबळ

कुठलाही विचार मांडणारी व त्याचं समर्थन करणारी व्यक्ती, विचारवंत या सदरात मोडते. या अर्थानं, भारतात काय किंवा भारताबाहेर काय, युगानुयुगं विचारवंत निर्माण होतच आले आहे; व ही प्रक्रिया भविष्यकाळीही खंडित होणार नाही, असं वाटतं.

समाजाला विचारवंतांची गरज असते त्याचप्रमाणं विचारवंतांनाही समाजाची गरज असतेच हे लक्षात घेता, "विचारवंताची समाजातील भूमिका" या विषयाबरोबरच "समाजाची विचारवंतांबाबतची भूमिका" असाही विषय चर्चेस घेणं अयुक्त ठरलं नसतं. पण संपादकांनी "विचारवंताची समाजातील भुमिका" एवढाच विषय ठेवला असल्यानं फक्त त्याचाच विचार प्रामुख्यानं, (कारण गौणत्वानं 'समाजाची विचारवंतांबाबतची भूमिका' याबद्दलही विषयानुषंगानं, माझं म्हणणं मी मांडलं आहे) या टिपणात मी माझ्या अल्पमत्यनुसार मांडत आहे.

समाजातील प्रत्येक व्यक्तीप्रमाणंच विचारवंत हा ही समाजाचा एक घटक असतोच. त्यामुळं, समाजाशी असंबद्ध राहुन त्याला चालण्यासारखं नाही, हे उघड आहे, मात्र, एखादा विचारवंत एखादा असा विचार मांडतो की तो समाजाला सकृद्दर्शनी स्वीकार्य वाटत नाही. म्हणून तो त्याविरुद्ध आपली नापसंती व्यक्त करतो. किंवा उदाहरणार्थ, स्वा. सावरकर यांनी जेव्हा अस्पृश्यतेच्या विरुद्ध व बुद्धिप्रामाण्यसमर्थक, विज्ञाननिष्ठावादी विचार व्यक्त केले, तेव्हा रुढ विचारांचं ते उल्लंघन असल्यानं, समाजातील रुढ विचारांचंच समर्थन करणाऱ्यांनी "सावरकर जनतेचा बुद्धिभेद करत

आहेत" असा एकच गिल्ला केला ! पण स्वा. सावरकरांनी त्यांना खणखणीत उत्तर दिलं, "मी जनतेचा बुद्धिभेद करत नसून दुर्बुद्धिभेद करत आहे !"

काही विचारवंत मात्र समाजाला न पटणारे विचार एकदम त्यांच्या गळी न उतरवता, आस्ते आस्ते, ते समाजात रुजवण्याचा प्रयत्न करतात. त्यांनाही समाजातून विरोध होत नाही, असं नाही; पण तो बराच सौम्य असतो. कालांतरानं तो मावळतोही; आणि तो अरुढ विचार रुढही होतो.

महात्मा गांधी, स्वा. सावरकर, डॉ. आंबेडकर यांच्यासारख्या अनेक थोर विचारवंतांनी, त्यांच्या विचारांनी समाज ढवळून काढला; व होणाऱ्या विरोधाला धैर्यानं तोंड देऊन, आपले विचार समाजात रुजवले. अशांना समाजाकडून फार हाल, अपमान, अन्याय, कुचेष्टा इ. सहन करावी लागतात. आमचे संतही यात मागं नव्हते. त्यातील प्रत्येकानं कुठला ना कुठला रुढ विचार नाकारुन समाजाचा रोष ओढवून घेतला होता. तोच समाज आज त्यांच्या आरत्या गात आहे ! राम गणेश गडकरी जे बोलून गेले, ते शाश्वत सत्य होतं ! "जिवंत तोवरि सत्ता देती, मरता परि खांद्यावरि घेती, उलटा हा सन्मान !" समाजाची ही रीत भूतकाळी होती, तशीच वर्तमानकाळीही आहे; आणि भविष्यकाळीही ती तशीच राही असं वाटतं. विचारवंत आणि समाज यांच्यात असं अंतर का पडतं ? एकच कारण संभवतं. विचारवंत हा समाजाच्या पेक्षा काही वर्षं पुढं असतो. म्हणूनच काही विचारवंतांना त्यांचे चरित्रकार गौरवानं द्रष्टा म्हणतात, ते अत्यंत योग्यच आहे.

समाजातील सर्वसामान्य मनुष्य समाजात बहुसंख्य असतो. तो, अल्पसंख्य असलेल्या विचारवंतांइतका अभ्यस्त नसतो. त्याचं वैचारिक अनुभवक्षेत्रही, विचारवंताच्या तुलनेत अत्यल्पच असतं. संसार व उदरनिर्वाहार्थ करावी लागणारी नोकरी, व्यवसाय यातून अटळतेनं उत्पन्न होणाऱ्या अनेक समस्या, यांच्या जंजाळात तो इतका गुरफटलेला असतो की एखाद्या विचारावर विचार करणं, त्याच्या दोन्ही बाजू तपासणं हे त्याला जवळजवळ अशक्य असतं. समाजातील दुसरा घटक धनिकवर्गाचा. तो वेगळ्याच चिंतेत व्यग्र असतो. "इच्छति शती सहस्त्रं, सहस्त्री लक्षमीहते" (ज्याच्या जवळ शंभर असतात, तो हजाराची इच्छा करतो; हजार जवळ असणारा लक्षाकडं लक्ष ठेवून असतो !) या संस्कृतोक्तीत त्याची मानसिकता यथार्थ व्यक्त होते. साहित्य, कला, तत्त्वज्ञान यासाठी त्यांच्याजवळ वेळच नसतो. त्यात त्याला रसही नसतो. यामुळं, विचारमंथन, त्यांची मांडणी, मंडन–खंडन इत्यादींचं उत्तरदायित्व, विचारवंत या अल्पसंख्य गटावरच येऊन पडतं. आणि म्हणून त्याला विचारवंत नसलेल्या, पण बहुसंख्य असलेल्या, समाजगटाशी जमेल तितक्या सामंजस्यानं वागणं अधिक आवश्यक ठरतं. आपल्या वैचारिक श्रेष्ठत्वाचा अहंकार, घमेन्ड व्यक्त न करता !

काही विचारवंतांचे विचार हे प्रामुख्यानं एका विशिष्ट जातीच्या, पंथाच्या, धर्माच्या विचारसरणीच्या लोकांसाठी असतात; तर काहींचे या भिंती ओलांडून अखिल मानवजातीला कवेत घेणारे असतात. यात, अमुक विचार चांगला अमुक वाईट, असं म्हणणं जरी अवघड असलं, तरी जो विचार सर्वांसाठी खुला तो मला अधिक श्रेष्ठ वाटतो. कुणी ब्राम्हण म्हणून, कुणी ब्राम्हणेतर म्हणून, कुणी दलित म्हणून तर कुणी दलितेतर म्हणून, यातून वगळला जात नाही. कारण समाजात हे सर्व आहेत व त्यांचे भेद संपूर्णपणे नष्ट होणं फक्त भविष्याधीनच आहे. कॉ. मानवेंद्रनाथ रॉय यांचे नवमानवतावादी विचार या दृष्टीनं लक्षणीय आहेत. अर्थात् त्यांच्या विचारांना, बुद्धिप्रामाण्यवाद. नास्तिक्य, विज्ञाननिष्ठा, मानवकेंद्रितता यांची ठळक झालर आहे; व ती धर्मनिष्ठ, श्रद्धावादी मंडळींना न मानणारी आहे. पण ही झालर सप्रमाण, तर्कशुद्ध व अप्रहार्य असल्यानं समाजानं तिची दखल घेणं आवश्यक आहे. समाजानं ती दखल गोगलगायीच्या गतीनं का होईना, घेतली आहे, असं स्पष्ट दिसतं. भारतात बुद्धिवाद्यांची टक्केवारी या शतकारंभी जेमतेम चारपाच होती ती आता अकरावारावर आली आहे; व पुढील शतकात ती वीसएकवीसवर जाईल असा अंदाज आहे. पाश्चात्य राष्ट्रांत ही टक्केवारी भारतापेक्षा दहा–वारा टक्क्यांनी अधिक आहे.

विचारवंतांची समाजातील भूमिका जातिधर्मनिरपेक्षता, समता, न्याय अशा सत्तत्त्वांवर आधारित असावी, असं मला वाटतं. कारण ही सत्तत्त्वं न मानल्यानं, नुसत्या भारतातच नव्हे तर सर्व जगात, विलक्षण अनागोंदी माजून समाज विकलांग झाला आहे ! भूतकाळातून हा धडा आपण वर्तमानकाळात न शिकलो, तर सर्वच समाजांचा भविष्यकाळ कुणालाच सुखावह न होणारा ठरणार आहे ! आपला वेगळाच कोश बांधणारे विचारवंत, त्यांची समाजाशी असलेली नाळ तोडतात; व आपल्याच हस्तिदंती मनोऱ्यात रममाण होतात ! किंबहुना विचारवंत नसलेल्या समाजबांधवांबावत ते एक प्रकारची तुच्छतेची भावना बाळगून असतात. अशांची स्वोन्नति कदाचित् होत असेल; पण ते समाजोन्नती साधू शकत नाहीत. त्यामुळं, त्यांची विद्वत्ता मान्य केल्यावरही, त्यांच्या समाजविमुखतेमुळं, समाजाला ते निरुपयोगीच ठरतात. नव्हे, क्वचित् ते उपद्रवकारकही ठरु शकतात !

रेल्वेच्या कार्यालयातील साडेअडोतीस वर्षांची कारकुनी व साडेएकोणपन्नास-वर्षांचा संसार, ही दोन्ही सांभाळून, बुद्धिवादी व श्रद्धावादी या दोन्ही साहित्यांचं जेवढं वाचन–मनन मी करु शकलो त्याआधारे आज मी स्वतःला बुद्धिवादी म्हणवून घेतो; कारण बुद्धिवादी विचारपद्धतीत मी जे विचार वर व्यक्त केले, त्या साऱ्यांना पूर्ण वाव मिळतो. श्रद्धावादी विचारपद्धतीत तो पूर्णांशानं मिळत नाही. असा माझा, माझ्या साडेत्र्याहात्तर वर्षांच्या जीवनाच्या अनुभवाना निष्कर्ष आहे. श्रद्धा–

वादी विचारवंतांच्या तुलनेत, बुद्धिवादी विचारवंत उपरोक्त सत्तत्त्वांचा अधिक मान करतांना दिसतात, असं माझं निरीक्षण आहे. आणि म्हणून, मी विचारवंत नसूनही एक सामान्यातिसामान्य मनुष्य या नात्यानं, वर वर्णिलेल्या सत्तत्त्वांचा पाठपुरावा, आजवर माझी समाजातील भूमिका म्हणून करत आलो आहे.

'आ नो भद्रा ऋतवो यन्तु विश्वतः' (सगळ्या विश्वातून चांगले विचार आमच्याकडं येवोत) या मला आवडणाऱ्या वैदिक सदिच्छेनं, माझं टिपण मी पुरं करतो.

***



# विचारवंतांचे समाजातील स्थान

डॉ. जे. एम. वाघमारे

जो आपल्या बुद्धीचा अर्थात विचारशक्तीचा सृजनात्मक उपयोग करतो त्याला आपण "विचारवंत" म्हणतो. थोर अमेरिकन तत्त्वज्ञ इमर्सन यांचा शब्दप्रयोग उपयोगात आणायचा झाला तर विचारवंताला Man Thinking अर्थात चिंतनशील मनुष्य असे म्हणता येईल. आपल्या प्रज्ञेचा विविध विषयांचे ज्ञान मिळविण्याच्या आणि त्या ज्ञानाचे संक्रमण करण्याच्या कामी जो उपयोग करतो त्यालाच खऱ्या अर्थाने विचारवंत मानले पाहिजे. अर्थात अशा प्रकारचा विचारवंत हा प्रबोधक असतो.

ज्या समाजात ज्ञानप्रबोधनाची प्रक्रिया निरंतरपणे चालू असते त्या समाजालाच आपली गतिशीलता सातत्याने टिकवून ठेवता येते. गतिशील समाजच कृतिप्रवण असतो, हे निराळे सांगण्याची आवश्यकता नाही, विवेकशील विचारशक्ती हीच सामाजिक कृतिप्रवणतेची आधारशिला असते. आणि म्हणूनच वैचारिक चिंतनशीलतेच्यामागे सामाजिक परिवर्तनाचे आवाहन असते. याचा अर्थ असा की चिंतनशील मनुष्य (Man Thinking) हा एका अर्थाने कृतिशील मनुष्य (Man Acting) देखील असतो. गतिशील समाजातील निरनिराळ्या आणि एकमेकांना छेद देणाऱ्या विचारप्रवाहांमुळे जे ताणतणाव निर्माण होत असतात त्यातूनच परिवर्तनाच्या दिशा व वाटा शोधाव्या लागतात. त्या दिशा ठरविण्याचे व वाट शोधण्याचे काम विचारवंतांना करावे लागते. आणि हे काम अखंडपणे चालू ठेवणे आवश्यक असते. विचारवंतांचे कार्य हे वस्तुतः सामाजिक अभियांत्रिकीचे कार्य असते.

समाजजीवनाच्या गतिविधींच्यामागे, रीतीरिवाजांच्यामागे आणि समाजात

राहणाऱ्या विविध मानवगटांच्या सामूहिक वर्तन–व्यवहारांमागे स्थूल असे एखादे वैचारिक तत्त्वज्ञान उभे असतेच. सामाजिक वर्तन–व्यवहाराच्या या तत्त्वज्ञानाला (Philosophy of Praxis) समाजातील विचारवंतांनीच एक प्रकारचा घाट प्राप्त करुन दिलेला असतो. कालपरत्वे त्याचे स्वरुप बदलत राहते, सर्वसामान्य स्त्री–पुरुषांच्या आचारविचारांच्या आशाआकांक्षा व आवश्यकतांच्या ताणतणावातून त्या तत्त्वज्ञानाचा चेहरामोहरा बदलत जातो आणि कालांतराने तो कालबाह्यही ठरतो. समाजात निरंतरपणे विचारप्रवर्तन होत असेल तर त्याच्या अखंडत्वातूनही (Continuity) परिवर्तन (Change) घडत असते. परंपरेतून निरंतर असे अर्थपूर्ण परिवर्तन घडविण्याच्या कामी विचारवंतांना महत्त्वाची भूमिका पार पाडावी लागते. याचा अर्थ असाच की, आपल्या संस्कृतीमध्ये कालबाह्य काय आणि कालसंगत काय, याचा निवाडा विचारवंतांना अगदी सचोटीने करावा लागतो. समाजाच्या मूल्यव्यवस्थेमध्ये "मृत" काय आणि "जिवंत" काय हे ओळखण्याची वैचारिक क्षमता सर्वसामान्य स्त्री–पुरुषांमध्ये असेलच असे नाही. ती क्षमता विचारवंतांमध्ये असते; आणि म्हणून त्यांनी सामान्य स्त्री–पुरुषांच्या आचारविचारांना डोळसपणा प्राप्त करुन दिला पाहिजे.

समाजजीवनामध्ये जेव्हा एखादा विचार किंवा एखादी विचारसरणी रुजते किंवा रुजवावी लागते, तेव्हा तो विचार किंवा ती विचारसरणी मूल्यनिरपेक्ष असून चालत नाही. ती मूल्यसापेक्ष असावी लागते. उपयुक्त अशा जीवनमूल्यांना उभारी देणारी वैचारिकता निर्माण झाली तरच ती व्यक्ती व समाजाला उभारी देऊ शकते. आणि जी मुल्ये कालबाह्य होत जातात त्यांच्या ठिकाणी कालसमांतर व कालोचित मूल्ये निर्माण करण्याचे व ती जनमानसात रुजविण्याचे कार्य विचारवंतांना करावे लागते. आणि म्हणून समाजाला व समाजातील विविध संस्थांना योग्य अशा मार्गावर चालण्याचे मार्गदर्शन विचारवंतांकडून अपेक्षित असते. समाजजीवनाच्या गाड्याला कालसंगत व मूल्यसापेक्ष विचारांचे व डोळस श्रद्धांचे वंगण पुरविण्याचे काम प्रज्ञावंतांनी करणे आवश्यक असते. सामाजिक बांधिलकीच्या भावनेने विविध प्रश्नांचे सत्यान्वेषी विश्लेषण करणारा आणि त्या प्रश्नांची उत्तरे शोधणारा विचारवंत हा खरे तर सामान्य जनांचा मार्गदर्शक, मित्र व तत्त्वज्ञ असतो. समाजजीवनाला "स्थितिशील" न बनविता "स्थैर्य" देण्याचे; तसेच "दिशाहीनते"ला प्रोत्साहन न देता त्याला 'परिवर्तनशील' बनविण्याचे सामर्थ्य ज्या विचार आणि मूल्यांतून मिळेल त्या विचार व मूल्यांचेच समर्थन करण्यासाठी विचारवंतांनी आपली प्रज्ञा पणाला लावली पाहिजे. आणि हे कार्य योग्यप्रकारे करायचे असेल तर विचारांची इष्ट–अनिष्टता ओळखण्याची बुद्धी विचारवंतांच्या जवळ असणे आवश्यक आहे. पण याउलट विचारवंतच जर कालबाह्य परंपरांना व मूल्यांना कवटाळून बसले तर समाजप्रबोधनाची प्रक्रिया

मंदावते आणि प्रसंगी मावळतेही. आणि म्हणून विचारवंतांवर एक मोठे सामाजिक दायित्व असते. या दायित्वाची जाणीव सातत्याने उरी बाळगणाऱ्या बुद्धिवादी वर्गाची (Intelligentsia) अनिवार्यता व महत्त्व राज्यकर्त्यांच्या लक्षात आले तर राष्ट्रीय जीवन प्रवाहपतित बनू शकत नाही. या दायित्वाची जाणीव प्रथमतः बुद्धिवादी वर्गालाच असणे आवश्यक आहे. आपल्या जबाबदारीची जाणीव असणारा बुद्धिवादी वर्ग हा समाजात वैचरिक 'जागर' घालीत असतो. समाज जागा ठेवण्यासाठी त्याला वैचारिक 'गस्त' घालावीच लागते. Eternal vigilance is the price of liberty. चिरंतन जागरुकता दाखविल्याशिवाय स्वातंत्र्याचे रक्षण करता येत नाही. संबंध समाजातच अशा प्रकारची जागरुकता निर्माण करावी लागते. आणि हे काम लोकशिक्षणाच्या माध्यमातून करणे आवश्यक ठरते.

वस्तुतः लोकशिक्षणाची जबादारी ही समाजनेच विचारवंतांवर सोपवलेली असते. 'शहाणे करुन सोडावे सकळ जन', हा समर्थ रामदासांचा उपदेश बुद्धिमंतांच्याचसाठी आहे. जनसामान्यांमध्ये जाणीवजागृती निर्माण करणे हे लोकशिक्षणाचे प्रमुख उद्दिष्ट असते आणि असले पाहिजे. जाणीवजागृती हीच लोकशिक्षणाची व प्रबोधनाची फलनिष्पत्ती असते आणि असली पाहिजे. सामान्य लोकांच्या मनात सामाजिक जाणिवा निर्माण करता आल्या तर ज्ञानाची कवाडे त्यांना उघडता येतील आणि विवेकशक्तीच्या वाटाही त्यांना सहजपणे सापडतील. त्यांच्या हातात जीवनव्यवहाराच्या तत्त्वज्ञानाचे पाठचपुस्तकच त्यामुळे पडेल. शेवटी 'तत्त्वज्ञान' म्हणजे तरी काय ? बरट्रँड रसेलच्या शब्दांत सांगायचे झाले तर, 'तत्त्वज्ञान' म्हणजे 'विवेकाची आसक्ती' अशी त्याची व्याख्या करता येईल. 'Philosophy' means 'love of wisdom'. आणि म्हणून तत्त्वज्ञान हे लोकशिक्षणाचे एक अविभाज्य अंग असले पाहिजे, असा रसेलचा आग्रह आहे. सामान्य लोकांच्या प्रश्नांचा विचार करणे आणि त्यांचे मार्गदर्शन करणे हे विचारवंतांचे काम असते आणि असले पाहिजे.

खरे तर विविध विचारांच्या प्रचार-प्रसारातूनच 'लोकमत' व पर्यायाने 'लोकमानस' तयार होत असते. निरनिराळे विचार हे जेव्हा निरनिराळ्या माध्यमांतून लोकांपर्यंत जाऊन पोहचतात आणि जेव्हा त्यांच्यावर उलटसुलट चर्चा व वादविवाद होतात तेव्हा कुठे लोकमत निर्मितीची प्रक्रिया पुर्णत्वाला जाते; आणि अंततः अशा या प्रक्रियेच्या सातत्यातूनच लोकमानस तयार होते वस्तुतः लोकमतनिर्मितीची प्रक्रियाही अखंडपणें चालूच राहते; आणि ती तशी राहणे आवश्यकही असते. लोकमत व लोकमानस बनविण्याच्या कामी बुद्धिमंतांना एक महत्त्वपूर्ण अशी भूमिका बजावावी लागते. विशेषतः लोकशाही जीवनमार्गाचा अवलंब केलेल्या राष्ट्रात लोकनिर्मितीच्या प्रक्रियेला अनन्यसाधारण महत्त्व असते. या कामात विचारवंतांना सिंहाचा वाटा उचलावा लागतो. समाजात मतमतांचा गलबला अव्याहतपणें

चालूच असतो. त्या गलबल्याला विचारवंतही कधीकधी जबाबदार असतात, तो गलबला चालूच राहिला तर समाज हा वैचारिक गोंधळात सापडल्याशिवाय राहात नाही. तो गोंधळ नामशेष करण्याचे वैचारिक साहस हे शेवटी एखाद्या विचारवंतालाच दाखवावे लागते.

खरे तर विचार करण्याचे काम वाटते तेवढे सोपे नाही, ही गोष्टही आपण लक्षात घेतली पाहिजे. इमर्सनने 'बुद्धिमत्ता' (Intellect) या विषयावर भाष्य करताना म्हटले आहे : 'What is the hardest task in the world? To think.', [1] पण ही कठिण कामगिरी विचारवंतांनी जबाबदारीच्या भावनेने स्वीकारलीच पाहिजे. 'बुद्धिमत्ता' म्हणजे 'विवेकबुद्धी' नव्हे, हेही लक्षात ठेवणे आवश्यक आहे. ज्ञानाला मूल्यांची जोड दिली म्हणजे 'बुद्धिमत्ता' ही 'विवेकबुद्धीत' रुपांतरित होते. ज्ञान हे बहुधा भूतकाळाशी प्रतिबद्ध असते; आणि विवेकशक्ती ही भविष्याचा वेध घेत घेत वर्तमानकाळातील प्रश्नांना सामोरी जाते. 'Knowledge will not lead to intelligence', [2] असे जे कृष्णमूर्ती यांनी एका ठिकाणी विधान केले आहे. प्रज्ञेला जेव्हा करुणेचा स्पर्श होतो तेव्हा तिला विवेकदृष्टी प्राप्त होते, 'The totality of this intelligence is compassion.'[3] असे जे कृष्णमूर्ती म्हणतात. सामान्य जनांच्याविषयी कळवळा असेल तर विचारवंतांच्या प्रज्ञेला मानवतावादाचे माध्यम बनता येते. सत्याचा शोध आणि मानवी सुखदुःखांशी तादात्म्य, या दोन उद्दिष्टांसाठी प्रज्ञेचा उपयोग केला पाहिजे. थोर विचारवंत बरट्रँड रसेलने आपल्या आत्मचरित्राच्या प्रस्तावनेला (Prologue) 'What I have lived for' असा मथळा दिला आहे. तिची सुरुवात अशी आहे : 'Three passions, simple but overwhelmingly strong, have governed my life : the longing for love, the search for knowledge and unbearable pity for the suffering mankind. These passions, like great winds, have blown me hither and thither, in a wayward course, over a deep ocean of anguish, reaching to the very verge of despair.' [4]

रसेलच्या आयुष्यातील या तीनपैकी शेवटच्या दोन प्रेरणा ह्या सर्वच विचारवंतांच्या जीवनातील मूलभूत प्रेरणा असल्या पाहिजेत, असे मला प्रामाणिकपणे वाटते. ज्ञानाचा शोध आणि मानवतेची सेवा या दोन प्रेरणा झंजावाताप्रमाणे प्रत्येक विचारवंतांच्या आयुष्यात का वाहू नयेत ? रुसो, रस्किन, व्हॉल्टेर, थोरो, थॉमस पेन, कार्ल मार्क्स, बरट्रँड रसेल आदी विचारवंतांची आयुष्ये या प्रेरणांच्या झंजावातात सापडली होती. व्हॉल्टेरसंबंधी व्हिक्टर ह्यूगोने म्हटले होते : 'Voltaire was more than a man; he was an epoch.' स्वातंत्र्याचा तो प्रणेताच

होता. रुसोने देखील मानवी स्वातंत्र्य व समतेसाठी अत्युच्च अशा प्रकारचा बौद्धिक लढा दिला होता. डॉ. आंबेडकरांचे ज्वलंत उदाहरण आपल्या समोर आहेच ना. बुद्धिवाद्यांच्यासमोर काय व कोणत्या प्रकारचा आदर्श असावा हे अशा बुद्धिवाद्यांच्या जीवितकार्याकडे पाहून आपल्याला कळू शकेल. हे सर्व बुद्धिवादी मानवतावादाचे खंदे पुरस्कर्ते होते. मानवी प्रतिष्ठेसाठी त्यांनी आपल्या उभ्या हयाती घालविल्या. विश्वस्पर्शी भाषेतून त्यांनी उदात्त अशा विचारांचा व भावनांचा आविष्कार केला. बौद्धिकशक्तीचा सृजनात्मक उपयोग त्यांनी केला तो स्वातंत्र्य, समता, न्याय व बंधुत्व या उदात्त अशा मूल्यांच्या प्रतिष्ठापनेसाठी.

जे विचारवंत ध्येयवादाने भारले जातात ते अभिजनवादापासून दूर राहतात. उच्चभ्रूत्व त्यांना स्पर्श करु शकत नाही. अभिजनवादी हे जनवादी असू शकत नाहीत. समाजात सामान्यजन हेच संख्येने अधिक असतात. वस्तुतः बहुजनसमाज हाच राष्ट्राचा कणा असतो. विचारवंत देखील समाजातच राहतात; पण बहुधा त्यांच्यामध्ये बहुजनांपासून अंतर ठेवून जगण्याची प्रवृत्ती असते. समाजशास्त्राच्या परिभाषेत या अंतराला 'सामाजिक अंतर' (Social Distance) म्हटले जाते. या अंतरामुळे बहुजन समाजाला 'अंतर' देण्याची प्रवृत्ती बुद्धिवादी वर्गात निर्माण होते बुद्धिवादी वर्गाची बुद्धिमत्ता ही बहुजन समाजाच्या शोषणाचे हत्यार बनते. भारतासारख्या जातिभेदावर आधारलेल्या समाजात तर बुद्धिवादी वर्ग हा उच्च जातीतून निर्माण झालेला आढळतो. ह्या वर्गाने वर्णवर्चस्ववादाचे व जातिश्रेष्ठतेचे तत्त्वज्ञान निर्माण केले. या तत्त्वज्ञानात सामाजिक विषमतेची विषबीजे आढळतात. सांस्कृतिक जीवनाची सर्व सत्ता आणि नोकरशाही ही अशा पराकोटीच्या अभिजन-वादी वर्गाच्या हाती असली की, मग समाजात निकृष्ट प्रकारचा 'विषमतोल' निर्माण होतो. अशा अवस्थेत सामान्यजनांना आपला तोल सांभाळून उभे राहण्याची व चालण्याची ताकद मिळू शकत नाही. गेल्या चाळीस-पन्नास वर्षांच्या कालावधीत या परिस्थितीमध्ये बराच फरक पडलेला आहे. तथापि बुद्धिवादी वर्गात स्वतःला जनसामान्यांपासून दूर ठेवण्याची स्वभाविक प्रवृत्ती असते. या प्रवृत्तीवर बुद्धिवाद्यांना मात करता आली पाहिजे. जसे चांगले शेतकरी आपल्या शेतात तण माजू देत नाहीत तसे चांगले बुद्धिवादीही आपल्या वैचारिक क्षेत्रात उच्चभ्रुत्वासारख्या अप-प्रवृत्ती वाढू देत नाहीत. बुद्धिवादी वर्ग स्वतःला समाजापासून वेगळा समजत असेल तर त्याला समाजपुरुषाचे मन कळू शकणार नाही. समाजाविषयी त्याच्या मनात औदासीन्य (Apathy) असेल तर त्याला आपल्या बुद्धीमत्तेचा उपयोग सामाजिक अभियांत्रिकीसाठी करता येणार नाही. त्याच्या मनात समाजाविषयी जिव्हाळा (Empathy) असला पाहिजे. त्याशिवाय त्याला स्वातंत्र्य, समता, न्याय व बंधुत्वाच्या आधारावर मानवी संस्कृतीचा सेतू बांधता येणार नाही. स्वतःसाठी

हस्तिदंती मनोरे बांधून त्यात कलात्मक असे कोरीव काम करणे वेगळे; आणि समाजातील विविध घटकांना, निरनिराळ्या धर्मश्रद्धा उराशी बाळगून जगणाऱ्या लोकसमुहांना व जगातील भिन्न भिन्न संस्कृतींना जोडण्यासाठी वैचारिक सेतू बांधणे वेगळे. बुद्धीच्या प्रकाशात विश्वातील सर्वच सत्यांचे दर्शन होईलच असे नाही. सर्वच वैश्विक रहस्यांचा गुंता बुद्धीला सोडविता येईलच असेही अगदी ठामपणे सांगता येणार नाही. शेक्सपियरचा हॅम्लेट म्हणतो ते खरे आहे :

'There are more things in heaven and earth, Horatio, than are dreampt of your philosophy.' [5]

तथापि बौद्धिकशक्ती ही एक प्रकारची उर्जाच असते. उर्जेवर सर्व प्रकारची यंत्रे चालतात. तद्वत बौद्धिकशक्तीवर समाजजीनातील सर्व यंत्रणा चालतात. विचारशक्तीला विवेकशील अशा भावनिक शक्तीची जोड मिळाली तर तिचे 'व्होल्टेज' निश्चितच वाढते. विज्ञानाने जी विस्मयजनक अशी प्रगती केली आहे ती लक्षात घेतली तर माणसाच्या कल्पनाशक्तीच्याही पुढे त्याच्या बौद्धिकशक्तीने झेप घेतलेली आपल्या दिसेल. आणि म्हणूनच कदाचित जे. कृष्णमूर्तींनी ज्ञानाला सीमा असते, पण प्रज्ञा ही असीम असते, असे एक विधान केले आहे. 'Intelligence is infintie. Knowledge, however vast is finite like tradition' [6] अशा या प्रज्ञेचा उपयोग अंततः मानवी जीवनाच्या विकासासाठी व सुखसमृद्धीसाठीच झाला पाहिजे. आणि म्हणून विचारवंतांनी आपल्या बुद्धिमत्तेचा उपयोग 'बहुजनसुखाय बहुजन हिताय' या उदात्त उद्दिष्टासाठी केला पाहिजे. गौतम बुद्धाने प्रज्ञेला करुणेची जोड दिली ती याच उदात्त हेतूने हे लक्षात घेणे आवश्यक आहे. विचारवंत हा विचारवंतांपेक्षा काहीतरी अधिक असतो. 'आयव्हरी टॉवर' मध्ये बसून केलेला व्यासंग बौद्धिक आनंद देत असेल. नाही असे नाहीं. पण अशा प्रकारच्या 'स्वान्तः सुखाय' बुद्धिवादाला परपीडांचा ≈ दंशनसतो. तो असला पाहिजे. विचारवंताला ज्ञानतृष्णा तर असावीच. पण परपीडांनी व्याकुळलेला विचारवंत हा मानवी जीवन बदलण्याच्या आंतरिक इच्छेने झपाटलेला असतो. अशा विचारवंतांना एका अर्थाने 'वैष्णवजन' म्हणायला काहीच हरकत नाही. रसेलचा तोच प्रयत्न होता. स्वतः विषयी तो म्हणतो 'Echoes of cries of pain reverberate in my heart. Children in famine, victims tortured by oppressors, helpless old people a hated burden to their sons, and the whole world of loneliness, poverty, and pain make a mockery of what human life should be. I long to alleviate the evil but I cannot and I too suffer.' [7]

रसेलप्रमाणेंच प्रत्येक विचारवंतांने म्हणावे : 'I long to alleviate the

evil, but I cannot, and I too suffer.' विज्ञानाला शहाणपणाची जोड मिळावी व त्याचा उपयोग माणसाच्या मूलभूत गरजा भागविण्यासाठी व्हावा, या हेतूने रसेलने आपली बुद्धिमत्ता आयुष्यभर पणाला लावली. ज्ञान, विज्ञान आणि विवेक यांच्या एकत्वातुन मानवी जीवनात सुखसमृद्धी आणता येईल अशी त्याची धारणा होती. 'विश्व शासना'ची (World Government) संकल्पना त्याने हिरिरीने मांडली; त्याच्यामागेही हीच श्रद्धा होती.

कार्ल मार्क्सही अशाच ध्येयाने प्रेरित झाला होता. तो म्हणतो : 'Philosophers have interpreted the world in various ways, the point however is to change it., [8] इतर तत्त्वज्ञांप्रमाणे त्यानेही जगाचा अर्थ लावण्याचा प्रयत्न केला. त्यासाठी त्याने हेगेलच्या तत्त्वज्ञानाला डोक्यावर उभे केले; आणि मग त्यातून त्याला इतिहासाचे एक वेगळे व यथार्थ असे दर्शन घडले; आणि त्याच बरोबर जग बदलण्याचा मार्गही सापडला. इतिहासक्रमात भौतिकवादी शक्ती कशा कार्यरत असतात आणि वर्गसंघर्ष कशा प्रकारे चाललेला असतो याचा आलेख त्याने मांडला. उत्पादन व्यवस्थेत श्रमिकांच्या 'अतिरिक्त श्रमाला' मोबदला न देता नफेखोरीसाठी भांडवलदार मजुरांना वापरत असतात· राजकीय सत्तेवर खऱ्या अर्थाने भांडवलदारांचा ताबा असतो आणि म्हणून उत्पादनव्यवस्थाच मुळात श्रमिकांच्या ताब्यात गेली पाहिजे; कारण त्याशिवाय श्रमिकांना चांगल्याप्रकारे जगता येणार नाही. कार्ल मार्क्सने एक प्रकारचे विस्फोटक असे तत्त्वज्ञान श्रमिक वर्गाच्या हाती दिले आणि त्याच बरोबर त्याने त्याला हाक दिली : 'जागातील श्रमिकांनो, एक व्हा' विचारवंतांची आपल्या प्रज्ञेवर व विचारशक्तीवर सखोल श्रद्धा असली पाहिजे. एखाद्या राष्ट्राची बौद्धिक उंची ही त्या राष्ट्रातील बुद्धिवादी वर्गाच्या बौद्धिक उंचीच्या आधारावर मोजली जाते, हे विसरुन चालणार नाही.

विचारवंतांचा वेगळा 'वर्ग' असतो का ? आणि त्यांच्यात वर्गीय भावना वास करते का ? भांडवलदारांजवळ 'भांडवल' असते. श्रमिकांजवळ 'श्रमशक्ती' असते. बुद्धिवाद्यांजवळ 'बौद्धिकशक्ती' असते. वर्गीय परिभाषेतच बोलायचे झाले तर बुद्धिवादी हे 'मध्यवर्गात' मोडतात. मध्यमवर्गीयांचे वेगळे प्रश्न असतात आणि आहेत. त्यांच्याजवळ बौद्धिक कौशल्ये असतात; वैचारिक हत्यारे व साधने त्यांच्या ताब्यात असतात. पण या वर्गाचा उपयोगही सत्ताधारी व भांडवलदार आपल्या मर्जीप्रमाणे करु शकतात. भांडवलदाराविषयी सुप्त अशी असूया आणि श्रमिक-वर्गाविषयी अनास्था अशा द्वंद्वात्मक मानसिक अवस्थेत ते सापडलेले असतात. एक प्रकारचे Alienation 'एलिएनेशन' त्यांच्यात वसत असते. त्याच्यावर मात करण्यासाठी/बौद्धिक अहंकाराचा आश्रय त्यांना घ्यावा लागतो.' व्हर्टिकल मोबिलिटी' च्या प्रयत्नातून काही बुद्धिमंत वरच्या स्थानावर जाऊन बसतात आणि त्यातून उच्च मध्यमवर्ग या नावाने ओळखला जाणारा एक पोटवर्ग तयार होतो. खालच्या

वर्गापासून हा 'उच्च' मध्यमवर्ग अधिक दूर जातो. शासनात तो नोकरशाहीची एक शृंखलाच तयार करतो. ती शृंखला बहुधा जनसामान्यांच्या हातापायातील बेडी–हातकडी ठरते. नोकरशाही ही शासन–सत्तेची वाहिनी असते. तिला सत्तेचे प्रयोजन म्हणजे सामाजिक न्याय, ही गोष्ट मान्य नसेल तर, ती शोषणाचे माध्यम बनते. जिला आपण अभिजनवादी अधिकारशाही (Power Elitism) म्हणतो, तिचा प्रादुर्भाव अशा प्रकारे होतो. पण जो बुद्धिवादी वर्ग शिक्षण, संशोधन, पत्रकारिता अशा बौद्धिक क्षेत्रात काम करतो त्याने समाजाला योग्य वळण देऊ शकेल अशा विचारसरणीचा पाठपुरावा केला पाहिजे. वास्तविक अशा प्रकारचे विचारवंतच खऱ्या अर्थाने ज्ञानसाधनेच्या व सांस्कृतिकमूल्य संवर्धनाच्या कार्यात सक्रिय असतात. भारतातील बुद्धिवादी वर्गाचे स्वप्नही आता बदलत चालले आहे. शिक्षण प्रसाराचा परिणाम म्हणून आता समाजाच्या खालच्या स्तरातूनही बुद्धिवादी वर्ग पुढे येत आहे. त्याला आपले 'रुटस्' (Roots) सांभाळता आले तर उच्चभ्रूत्वापासून तो सुरक्षित राहू शकेल.

विचारवंताजवळ बुद्धिप्रामाण्य नसेल तर बौद्धिक स्खलनाला उत्तेजन मिळते. विचारवंतांजवळ वैचारिक नीतिमत्ता (Intellectual Integrity) नसेल तर बुद्धिवाद हा केवळ पोकळ, निष्प्रभ आणि निरर्थक ठरतो. खरा विचारवंत हा सत्यशोधक असतो. त्याची वाणी व लेखणी ही सत्यान्वेषी असते आणि असली पाहिजे. सत्य हे विमोचक असते; आणि म्हणून खरे ज्ञान हे समाजाला अंधश्रद्धा आणि रुढी–परंपरांच्या कचाट्यातून मुक्त करते. ज्ञानार्जन आणि शिक्षण संक्रमणाचे महत्त्व त्यामुळेच. 'सा विद्या या विमुक्तये' हे सुभाषित सदैव ध्यानात ठेवणे आवश्यक आहे. एखाद्या समाजाची नैतिक उंची, सांस्कृतिक पातळी आणि त्याचे अंगभूत असे नीतिधैर्य हे त्या समाजातील बुद्धिवादी वर्गावरुन (Intelligentsia) ठरविले पाहिजे. राष्ट्राचा सांस्कृतिक वारसा हा त्या राष्ट्रातील लेखकांनी, कलाकारांनी, तत्त्वचिंतकांनी, संशोधकांनी, इतिहासकारांनी व समाजसुधारकांनी निर्माण केलेला असतो, राष्ट्राचा सांस्कृतिक वारसा निर्माण होतो तो वैचारिक निष्ठेतून, बौद्धिक साहसातून आणि विवेकबुद्धीच्या चिंतनशील सृजनातून हे निराळे सांगण्याची आवश्यकता नाही. तो वारसा जतन करण्याचे कामही पुढील काळातील प्रत्येक पिढीतील विचारवंतांचेच असते. त्याची समीक्षा करणे, त्याच्यावर भाष्य करणे, त्याचे पुनर्मुल्यांकन करणे. नवीन संदर्भात त्याची उपयुक्तता ठरविणे आणि त्याच्यात जे शाश्वत आहे, त्याचा गौरव करणे, हे कामही बुद्धिवाद्यानाच करणे भाग आहे. जुन्या परंपरामध्ये सर्व काही वाईट आहे व कालबाह्य आहे असे समजण्याचे कारण नाही. सर्वच परंपरांचा त्याग म्हणजे throwing the baby with bath-water असा प्रकार ठरेल. बौद्धिकनिकषांवर त्यांची चिकित्सा व मूल्यांकन करणे

आवश्यक असते. बुद्धिमंतांना हे पूर्वग्रहांच्या पलीकडे जाऊन करता आले तर ते समकालीन पिढीच्या हाती एक प्रकारचे 'मीमांसाशास्त्र' (Critique) देऊ शकतील. ते 'मीमांसाशास्त्र' राष्ट्राची 'अस्मिता' समजून घेण्यासाठी उपयोगी पडू शकते. आपल्या राष्ट्रीय चारित्र्याचे सार-तत्त्व आणि सार-तत्त्व काय हे आपल्याला कळू शकेल.

गतकाळातील समाज आणि विविध सामाजिक संस्थांची समीक्षा करताना एखादा विचारवंत अर्थगर्भ अशा संकल्पनाही निर्माण करुन जातो. एखाद्या संशोध-काच्या आणि समाज शास्त्रज्ञाच्या हाती शाश्वतस्वरुपाचे 'तत्त्व' सापडते आणि ते तो सूत्ररुपाने मांडतो. अशा संकल्पनांचा व विचारसूत्रांचा उपयोग पुढील पिढ्यांना निश्चितच होतो. विचाराला चालना देण्याची ताकद त्यांच्यामध्ये असते. इतिहास-क्रमाला प्रेरणा देण्याचे कामही त्यातून घडते, उदाहरणादाखल एक दोन गोष्टींचा येथे उल्लेख करणे उपयुक्त ठरेल. अमेरिकेचा इतिहास लिहित असताना व त्यावर भाष्य करीत असताना फ्रेडरिक जॅक्सन टर्नर या इतिहासकाराने 'फ्रंटियर'ची संकल्पना मांडली, संकल्पना आजपर्यंत सर्व अमेरिकन पिढ्यांना प्रेरणा देत आलेली आहे. स्वातंत्र्यासाठी साहस हवे आणि सर्वप्रकारच्या सीमांना (Frontiers) ओलांडण्या-साठी प्रयत्नांची परिसीमा हवी, हा विचार या संकल्पनेने दिला व्यक्ती, समाज व राष्ट्र यांच्या साहसाला सीमा नसते. असलीच तर ती केवळ आकाशाची असते : Skay is the only limit; हा विचार अमेरिकनांच्या मनात या संकल्पनेने खोलवर पेरला. सर्व भौगोलिक सीमा संपवून कोलंबसाच्या साहसाने काळ आणि अंतरातील (Time and space) सीमा ओलांडण्याचा उपक्रम अमेरिकनांनी हाती घेतला. ज्याला टर्नर 'fıontiersman's spirit' म्हणतो तो सांभाळण्याचा प्रयत्न अमेरिकन माणूस सातत्याने करतो, एखादा शब्द किंवा शब्दप्रयोग अशा प्रकारे शाश्वत स्वरुप व चिरमूल्ये धारण करतो. त्या (Phrase) 'फ्रेज'च्या आधारावर पुढील विचारवंतांना ऐतिहासिक घटनांचे 'पॅराफ्रेजिंग' (Paraphra-sing) करावे लागते.

चॉर्लस् डार्विनने संशोधनाअंती 'नॅचरल सिलेक्शन' चा सिद्धांत मांडला. आणि युरोपमधील विचारवंतांनी तो समाजजीवनातील सर्व क्षेत्रांना व संस्थांना लागू करण्याचा प्रयत्न केला. त्याच्या आधारावर वसाहतवाद, वंशवाद व साम्राज्य-वादाचे समर्थन करण्यात आले. 'जिसकी लाठी उसकी भैंस' या जुन्या रानटी तत्त्वाला विज्ञानाचा आधार मिळवून देण्यात आला. पण त्याच्या भीषण परिणामां-च्याविरुद्धही विचारवंतांनाच आवाज उठवावा लागलेला आहे. विचारक्षेत्रातही धोक्याची अनेक ठिकाणे असतात, त्यांची जाणीव विचारवंतांना तर असलीच पाहिजे; पण त्याच बरोबर त्यांनी त्या धोक्याची जाणीव सर्व समाजाला देखील

करुन दिली पाहिजे. चुकीच्या युक्तिवादातून अनेक अरिष्टे या जगात ओढवलीं आहेत.

अभिजात विचारवंत हा आपल्या हाती एखादे 'समीक्षासूत्र' देतो. त्याचा आधार घेऊन अनेक प्रश्नांचे विश्लेषण करण्याची दृष्टी आपल्याला लाभते. रुसोने 'सामाजिक करार' हा ग्रंथ आपल्या हाती दिला. एक प्रकारचे मीमांसाशास्त्रच त्याने जगातील सर्व राजकीय विचारवंतांच्या हाती देऊन ठेवले, आपल्या या पुस्तकाच्या प्रस्तावनेत रूसो म्हणतो : 'स्वतःच्या कुवतीचा विचार न करता एक मोठा ग्रंथ लिहिण्याचे काम मी अंगावर घेतले. त्याच्यातील एक लहान भाग म्हणजे हा प्रबंध आहे.' ९ पण या लहान प्रबंधाने महान चमत्कार केल्याची नोंद इतिहासाने घेतली आहे. रूसो म्हणतो : 'मानवाचा जन्म स्वातंत्र्यात झाला. परंतु सगळीकडे तो शृंखलाबद्ध-अवस्थेत दृष्टीस पडतो.' 10 हे रूसोचे या पुस्तकातील पहिले विधान आहे. स्वातंत्र्य हा मानवाचा जन्मसिद्ध हक्क आहे आणि तो त्याला मिळवून देण्यासाठी शृंखलाबद्ध अवस्थेतून त्याची . मुक्तता केली पाहिजे, या ध्येयाने तो भारला गेला होता. या ध्येयवादाने जगातील बुद्धिमंतांना सतत आव्हान दिलेले आहे. थोरोच्या 'Civil Disobedience' या निबंधाने गांधीजींच्या हातात असहकाराचे प्रभावी शस्त्र देऊन ठेवले. थोरोने काळाच्या प्रवाहाविरुद्ध जाण्याचीच प्रतिज्ञा केली होती. अभिजात विचारवंत हा 'प्रोटेस्टंट' असतो. तो 'नॉनकन्फॉर्मिस्ट' असतो.. आणि म्हणून एकट्यानेच प्रवास करण्याची त्याची मानसिक तयारी असते. थोरोचा वाल्डन (Walden) हा ग्रंथ वाचल्यानंतर आपल्याला या गोष्टीचा प्रत्यय येतो. वेगळ्या वाद्यांच्या शोधात तो होता, आणि म्हणून वेगळ्या आवाजाची व वेगळ्या संगीताची तो निवड करतो. एक विचारवंत म्हणून थोरोने जी आपली भूमिका मांडली आहे ती अशी : 'If a man does not keep pace with his companions, perhaps it is because he hears a different durmmer. Let him step to the music which he hears, however measured or far away.' 11 थोरो प्रमाणे जॉन रस्किनलाही वेगळाच आवाज आणि वेगळेच संगीत ऐकू आले. त्याच्या 'Unto This Last' या पुस्तकाने गांधीजींना सर्वोदयाचे तत्त्वज्ञान निर्माण करण्याची दृष्टी दिली. अशा अनेक प्रज्ञावंतांच्या ऐतिहासिक कार्याचा उल्लेख करता येईल. झोपलेल्या समाजाला जागे करण्याचे, जागे झालेल्या समाजाला उठण्याचे व उठलेल्या समाजाला चालण्याचे सामर्थ्य देण्याचे कार्य विचारवंतांनी केले पाहिजे.

आणखी एक उदाहरण. 'Rise of the Maratha Power' हा ग्रंथ लिहून न्या. महादेव गोविंद रानडे यांनी मराठा साम्राज्याच्या उदयाची कारणमीमांसा केली. आणि इतिहासक्रम समजण्यास उपयुक्त ठरणारे एक 'विश्लेषणसंश्लेषण

सूत्र' आपल्या हाती दिले. जसे फ्रेंच राज्यक्रांतीच्या मागे रुसो, व्हॉल्टेर आदी विचारवंतांचे प्रबोधन होते तसे शिवाजी महाराजांच्या हिंदवी स्वराज्याच्या उठावामागे मराठी संतांचे लोकजागण होते. वृक्षाच्या फांदीवर एका रात्रीतून फळे लागत नसतात. आधी जमीन तयार करावी लागते, मग त्या जमीनीत बीजारोपण करावे लागते, ते बीजांकुर वाढविण्यासाठी खतपाण्याची व्यवस्था करावी लागते आणि शेवटी वाढलेल्या वृक्षाची देखभाल करावी लागते. एवढे केल्यानंतर तो वृक्ष फुलतो आणि शेवटी फळतो. न्या. रानडयांनी मराठा सत्तेच्या उदयाची कारणमीमांसा करण्यासाठी ही 'ॲनॅलॉजी' उपयोगात आणली. मराठा सत्तेचा उदय म्हणजे भारताच्या इतिहासातील एक फार मोठी फलनिष्पत्ती होय. तिच्यासाठी जमीन तयार करण्याचे, बीजारोपण करण्याचे व त्याच्यातून एक मोठा वृक्ष वाढविण्याचे काम संतांनी केले. ही ऐतिहासिक वस्तुस्थिती रानडयांनी अशा या समर्पक सूत्रात मांडली आहे. अशा प्रकारचे विचारसूत्र एखादा प्रश्न समजून घेण्यासाठी निश्चितच उपयुक्त ठरते. हे वेगळे सांगण्याची आवश्यकता नाही. खऱ्या विचारवंतांना समाजजीवनाची 'जाण' आणि काळाच्या अंतरंगाचे 'भान' मानले पाहिजे. आपल्या विचारसामर्थ्याने इतिहासाला वळण देणाऱ्या व समाजजीवनाला धार देणाऱ्या बुद्धिमंतांना जगाचे 'लेजिस्लेटर्स' मानायला काहीच हरकत नाही, समकालीन समाजासमोरील प्रश्न आणि आव्हाने लक्षात घेऊन गतकाळातील घडामोडींवर चिकित्सक व संतुलित दृष्टी टाकण्याचे कठीण 'कर्म' देखील विचारवंताला करणे भाग आहे. भूतकाळ आणि वर्तमानकाळ यांच्यातील दुवा म्हणूनही त्यांच्याकडे पाहिले जाते. इतिहासाच्या चौरस्त्यावर हातात लाल आणि हिरवा, असे दोन्ही कंदील घेऊन तो उभा असतो.

त्या त्या काळखंडात त्या त्या राष्ट्रातील विचारवंतांसमोर वेगवेगळी आव्हाने उभी असतात. ती आव्हाने स्वीकारण्याचे नैतिक साहस व बौद्धिकक्षमता विचारवंतांनी दाखविणे आवश्यक आहे. भारतीय विचारवंतांसमोर कोणती आव्हाने आहेत ? वस्तुतः ती अनेक आहेत. आपल्या राष्ट्राच्या अस्तित्वालाच धोका निर्माण करणाऱ्या अनेक अनिष्ट शक्तींचा प्रादुर्भाव झालेला आपण आज पाहत आहोत, राष्ट्रीय एकात्मता कशी निर्माण करायची हाच एक मोठा प्रश्न आपल्यासमोर उभा आहे. खऱ्या अर्थाने राष्ट्रीय चारित्र्यच आपण अद्याप निर्माण करु शकलो नाही. जे राष्ट्र सातत्याने चारित्र्याच्या 'क्रायिसिस' (Crisis) मध्ये सापडलेले असते त्याच्यासमोर अनेक आव्हाने उभी असतात. ती पेलायची कशी याचा विचार बुद्धिवंतांनी केलाच पाहिजे. प्रश्नांच्या मुळापर्यंत जायचे काम विचारवंतच करु शकतील. राष्ट्रात प्रबोधनाची प्रक्रिया निरंतरपणे चालू ठेवली तर अनेक प्रश्नांची उकल करण्याचा प्रयत्न सामान्य लोकदेखील करु शकतील. पण आवश्यक ते प्रबोधन अखंडपणे तेवत ठेवण्याचे काम विचारवंतांचे असते.

आपल्यासमोर आज सर्वात मोठे आव्हान उभे आहे ते धर्मनिरपेक्ष समाजवादी लोकशाही समाजरचनेचे. भारतीय राज्यघटनेने आमच्यासमोर अशा धर्मनिरपेक्ष समतावादी लोकशाही समाजाचे चित्र उभे केले आहे. या समाजाची संकल्पना ही स्वातंत्र्य, समता, न्याय व बंधुत्वाच्या मूल्यांवर आधारलेली आहे. आणि म्हणूनच घटनेने या मूल्यांचा व तत्त्वांचा अंगिकार व पुरस्कार केलेला आहे. विषमतेचा पुरस्कार करणाऱ्या जाति-धर्मभेदांवर या देशातील सामाजिक जीवन आधारलेले असल्यामुळे धर्मनिरपेक्ष लोकशाही जीवनमूल्ये जनमानसात अद्याप रुजू शकलेली नाहीत. जुन्या मूल्यसरणीवर नवसमाजाची रचना करणे ही केवळ अशक्य कोटीतील गोष्ट आहे. नव्या समाजाच्या रचनेसाठी नव्या मूल्यव्यवस्थेची आवश्यकता असते. विषमतेला खतपाणी घालणाऱ्या मूल्यांचा त्याग केल्याशिवाय नव्या मूल्यांना कसे रुजवता येईल ? आणि म्हणूनच येथील सामाजिक व सांस्कृतिक जीवनाचीच पुनर्रचना करणे भाग आहे. भारतीय समाजाइतका 'हायरार्किकल' समाज दुसरा नाही ही वस्तुस्थिती आहे. पाश्चिमात्य समाजशास्त्रज्ञांनी तर भारतीय माणसालाच Homo Hierarchicus ही संज्ञा दिली आहे. अर्थात ही स्थिती पालटली पाहिजे.

भारतीय विचारपरंपरेमध्ये मानवी प्रतिष्ठेच्या समतेचा पुरस्कार करणारे विचारवंत कुणी झालेच नाहीत. असे कोण म्हणेल ? बुद्ध-चार्वाकापासून ते कबीर नानक व फुले-आंबेडकरांपर्यंत समतावादी विचारवंतांची मालिका आपल्याला दिसून येते. परंतु हा समतावादी विचारप्रवाह क्षीण राहिलेला आहे व प्रसंगी तो लुप्तही झालेला आहे. सरस्वती या पवित्र नदीप्रमाणे तो प्रवाह जमिनीच्या पृष्ठभागावर खळाळुन वाहताना आपल्याला फारसा दिसलाच नाही. हे असे का घडले ? परिवर्तनवादी विचाराचा पराभव या देशात पुनःपुन्हा होण्याचे कारण काय ! खरे तर अशा प्रकारचा समतावादी विचार जनसामान्यांपर्यंत पोचवण्यासाठी प्रचंड अशा प्रबोधनाची आवश्यकता असते. ते प्रबोधन सातत्याने या देशात कुणी केलेच नाही. परिवर्तनवादी विचारवंतांची अखंड अशी साखळी येथे निर्माण झाली पाहिजे. पण ती निर्माण झालीच नाही. परिवर्तनाचा पुरस्कार करणाऱ्या विचारांच्या सुटचा सुटचा कड्या असून केवळ भागत नाही. मजबूत अशी एक अखंड साखळीच असावी लागते. अशा प्रकारची अखंड 'Chain of Being' भारतीय विचारपरंपरेत सापडत नाही. आणि म्हणून ती तयार करणे हे भारतीय विचारवंतांच्या समोरचे एक फारच मोठे आव्हान आहे. आहेत त्या सुटचा कड्या जोडण्याचे व स्वतःला त्यात गोवण्याचे काम भारतीय विचारवंताला करणें भाग आहे. नव्हे, काळाची ती मागणीच आहे. इतिहासाची कठोरपणे चिकित्सा करणेही तितकेच आवश्यक आहे. इतिहासाचा या पुढील प्रवाह बदलायचा असेल तर प्रसंगी वैचारिक बंडखोरीही दाखवावी लागेल. मूर्तिभंजनाचे कामही कठोरपणें करावेच लागेल. अलिकडच्या काळातला सर्वात मोठा

मूर्तिभंजक म्हणजे डॉ. आंबेड्कर ! भारतीय समाजाच्या पुनरंचनेसाठी आंबेडकरांच्या विचाराचा आधार घ्यावाच लागेल.

समाजजीवनाला उभारी देण्याचे काम विविध संस्था करीत असतात. परंतु त्या संस्था कलांतराने दुर्बल तरी होतात किंवा कालबाह्य तरी ठरतात. या देशात जातिसंस्था एक अशी संस्था आहे की जी कालबाह्य ठरुनही दुर्बल झालेली नाही. उलट ती बहुरुप्याप्रमाणे आपले बाह्यरुप बदलत बदलत अधिक प्रबल होत चाललेली दिसते. जातिव्यवस्था ही आमच्यासमोर 'स्फिंक्स' (Sphinx) सारखी उभी आहे. वस्तुत: भारतीय इतिहासातील 'जात' हेच एक फार मोठे कोडे (Riddle) आहे. आणि ही जातिव्यवस्था ठामपणे उभी आहे ती लोकशाही समाजव्यवस्थेच्या अगदी विरोधात. सामाजिक समतेचे तिला वावडे आहे. याउलट लोकशाही समाजव्यवस्था ही समतेशिवाय अस्तित्त्वात येऊ शकत नाही आणि अर्थपूर्णही ठरु शकत नाही. स्वातंत्र्याचा उपभोग आणि साक्षात्कार समाजाच्या तळागाळातील लोकांना होऊ शकेल तो समतेच्या माध्यमातूनच. अन्यथा नाही. समतेची संकल्पना जनमानसात खोलवर रुजविल्याशिवाय लोकसत्ताप्रधान समाज आणि संस्कृती निर्माण होऊ शकणार नाही. या कामी बुद्धिमंतांचे योगदान बहुमोल ठरेल यात काहीच शंका नाही. खरे तर अत्युच्च ध्येयवादाने भारलेल्या समकालीन विचारवंतांचे ते जीवित कार्यंच आहे. मानवेंद्रनाथ रॉय यांनी नवमानवतावादाची जी बावीस सूत्रे मांडली आहेत त्यातील एकोणीसावे सूत्र खालील प्रमाणे आहे :

'बुद्धिवरील बंधने तोडून टाकून आत्मिकदृष्ट्या स्वतंत्र झालेली माणसे स्वातंत्र्याचे जग निर्माण करण्याच्या दृढ निश्चयाने जेव्हा एकत्रित होतील, तेव्हाच त्यांच्या सामुदायिक प्रयत्नांनी मूलगामी लोकसत्तेचे ध्येय साध्य होईल. ते भावी काळातील राज्यकर्ते म्हणुन नव्हे तर जनतेचे मार्गदर्शक, मित्र व तत्त्वज्ञ या नात्यानेच कार्य करतील. त्यांचे राजकीय वर्तन व कार्य बुद्धिप्रधान आणि म्हणूनच नैतिकही राहील; कारण त्याखेरीज ते स्वातंत्र्याच्या ध्येयाशी सुसंगत राहणार नाही. ज्या प्रमाणात जनतेची स्वातंत्र्यकांक्षा वाढीस लागेल, त्या प्रमाणातच त्यांचे प्रयत्नात वाढ होईल. आणि सुजाण लोकमत व लोकांचा ज्ञानयुक्त प्रयत्न त्यांच्या साह्याने प्रत्यक्ष लोकशाहीचे राज्य होईल. सत्तेचे केंद्रीकरण आणि स्वातंत्र्य यांच्यात परस्पर विसंगती आहे; याची जाणीव असल्यामुळे सर्वंच विकेंद्रीकरण करणें हा त्यांचा उद्देश राहील.' 12

विचारवंतांचे समाजात काय स्थान असावे; त्यांची समाजाशी कशा प्रकारची प्रतिबद्धता असावी; आणि लोकांशी त्यांचे ऋणानुबंध कशा प्रकारचे असावेत; आणि लोकसत्तेवर आधारलेल्या समताधिष्ठित नवसमाजनिर्मितीसाठी त्यांचे योगदान काय असावे, याची स्पष्ट कल्पना मानवेंद्रनाथ रॉय यांच्या शब्दांतून व्यक्त झालेली आहे.

प्रामुख्याने शिक्षण, संशोधन, पत्रकारिता, साहित्य आणि न्यायसंस्था या क्षेत्रांशी निगडीत असलेल्या बुद्धिमंतांवर एक विशेष जबाबदारी आहे, असे मला प्रामाणिकपणे वाटते. संशोधन, ज्ञानसंक्रमण व ज्ञानसंवर्धनाचे कार्य हे प्रामुख्याने शिक्षणक्षेत्रातील बुद्धिमंतांना करावे लागते. नवीन पिढ्या घडविण्याची जबाबदारी त्यांच्यावर असते हे विसरुन चालणार नाही. हे दायित्व त्यांना स्वीकारावेच लागेल. इतिहास, संस्कृती, तत्त्वज्ञान, साहित्य व सामाजिक शास्त्रे यांच्यातील संशोधन हे एका अर्थाने भूगर्भशास्त्रीय सर्वेक्षणासारखे असते. उत्खनन करीत असताना एखादा उपयुक्त खनिजपदर्थ अनपेक्षितपणे हाती लागू शकतो. तद्वत् संशोधन करीत असताना एखादा नवीन विचार संशोधकाच्या हाती येऊ शकतो. समकालीन व भावी समाज-जीवनाला कलाटणी देण्याचे सामर्थ्य त्यात असू शकते. तेव्हा मूलभूत संशोधनाचे कार्य देशातील विद्यापीठांनी बौद्धिकनिष्ठा अंगी बाळगून करणे आवश्यक आहे. भारतीय विद्यापीठांच्या कार्य व उद्दिष्टांच्या संदर्भात पं. जवाहरलाल नेहरु यांनी जी अपेक्षा व्यक्त केली होती ती अशी : 'A university stands for humanism, for reason, for progress, for the adventure of ideas and the search for truth. It stands for the onward march of the human race towards even higher objectives.'[13] हे कार्य निष्ठेने करण्याची जबाबदारी प्राध्यापकांवर आहे हे निराळे सांगण्याची आवश्यकता नाही.

लेखक आणि पत्रकार हे तर सामान्य माणसाच्या व समाजातील दुर्बल घटकांच्या स्वातंत्र्याचे पालक व रक्षक असले पाहिजेत. राज्यघटनेने जनतेला जे मूलभूत अधिकार दिलेले आहेत ते मिळवून देण्यासाठी लेखक व पत्रकारांनी सातत्याने प्रयत्न केले पाहिजेत. राष्ट्रीय एकात्मता, आंतरराष्ट्रीय सामंजस्य, अण्वस्त्रबंदी व जागतिक शांतता आणि वर्णभेदविरोध अशा प्रश्नांना प्राधान्य देऊन आग्रही भूमिका घेणे आवश्यक आहे. दुर्बल जातिसमूहांच्या व समाजघटकांच्या प्रदीर्घ शोषणातून काही वरिष्ठ जातिघटक आर्थिकदृष्टया संपन्न झालेले आहेत; म्हणून दुर्बल जातिसमूहांना व समाजघटकांना 'विशेष' सवलती व संधी देऊन त्यांना पुढे आणण्यासाठी विचारवंतांनी बौद्धिक लढा देणे आवश्यक आहे. त्याशिवाय सामाजिक न्याय हा शोषितांच्या पदरात पडणार नाही. आजची राष्ट्रे वैभवसंपन्न म्हणून ओळखली जातात. त्यांनी एकेकाळी तिसऱ्या जगातील राष्ट्रांवर वसाहतवाद लादला होता; त्यांच्या आर्थिक शोषणातून ते संपन्न झाले. या विकसित राष्ट्रांनी अधिकाधिक अविकसित राष्ट्रांना भरीव मोफत मदत केली पाहिजे; नव्हे त्यांचे हे नैतिक कर्तव्य आहे, असा विचार अतिशय हिरिरीने मांडला गेला पाहिजे. विशेष संधी व 'डिसक्रिमिनेटिव्ह जस्टिस' 'Discriminative Justice' च्या संकल्पना आंतरराष्ट्रीय

संबंधांच्या संदर्भातही लागू करण्याचा आग्रह आपण का धरु नये ? आजच्या विचाराला वास्तवात रुपांतरित करण्याचा आपण आग्रह का धरु नये ?

प्रत्येक कालखंडात विशिष्ट अशी एखादी वैचारिक व नैतिक प्रेरणा (Zeitgeist) मानवी भवितव्याचा वेध घेण्याचा प्रयत्न करीत असते, अशा प्रेरणेला 'युग–प्रेरणा म्हटले जाते. आपल्या युगाची प्रेरणा कोणती ? समान मानवी प्रतिष्ठा हीच आपल्या युगाची प्रेरणा आहे. या प्रेरणेमुळेच राष्ट्रांच्या राजकीय स्वातंत्र्यला सामाजिक आशय प्राप्त होत असतो. परंतु या प्रेरणेला आपल्या देशात अद्याप साकार होता आलेले नाही. नेहरुंनी म्हटले आहे : 'The spirit of the age is in favour of equality, though practice denies it almost everywhere.' [14] तेव्हा समतेचा बौद्धिक लढा अद्याप संपलेला नाही. 'Yet the spirit of the age will triumph.' [5] हा नेहरुंचा आशावाद सर्व विचारवंतांचाच आशावाद असला पाहिजे.

आपल्या देशात समतेसाठी अनेक संघटना आज संघर्ष करताना दिसताहेत. दलितमुक्ती व स्त्रीमुक्तीचे लढे ठिकठिकाणी सामाजिक कार्यकर्ते लढविताहेत. या सामाजिक कार्यकर्त्यांना सामाजिक शास्त्रज्ञांचे सक्रिय सहकार्य मिळाले तर त्या लढ्यांना आपल्या दिशा स्पष्ट करुन घेता येतील; त्यांना वैचारिक पाया मिळेल; आणि त्यांना आपले नीतिधैर्य ढळू न देता यशप्राप्तीच्या मार्गावर आपल्या काफिल्या–सहित कूच करता येईल. वैचारिक सुस्पष्टता नसली की अशा प्रकाचे लढे वैफ–ल्याच्या धुक्यात सापडतात. विचारवंतांना अशा लढ्यात मार्गदर्शक म्हणून काम करता येईल.

विचारवंतांचे समाजात काय स्थान असते आणि असावे ? या प्रश्नाचे उत्तर विचारवंतांचे समाजाला योगदान काय, व काय असावे, या प्रश्नाच्या उत्तरावर अवलंबून आहे. विचारवंतांनी समाजाला संजीवक विचार, विवेकदृष्टी आणि उज्ज्वल भवितव्यासाठी आाशावाद, या तीन गोष्टी दिल्या पाहिजेत असे मला वाटते. मानवी जीवनाला जे अलोकित करते ते ज्ञान आणि बंधमुक्त करते ते विज्ञान. विचारवंत हा खऱ्या अर्थाने ज्ञान–विज्ञानाचा साधक असतो. त्याची मानसिकता ही क्रांतिप्रवण असते. ती क्रांतिप्रवणच असली पाहिजे. त्याशिवाय परिवर्तनाची अपेक्षाच करता येणार नाही. समाजपरिवर्तनाच्या प्रक्रियेत विचारवंत हा प्रेरक असतो हे विसरुन चालणार नाही.

संदर्भटीपा

1. Ralph Emersan; Essays (New Delhi : Eurasia Publishing House, 1955) P. 198.

2. J. Krishnamurti, Letters to the School (Madras :

Krishnamurti Foundation. 1986) P. 16

3. Ibid, P. 64

4. Bertrand Russell Autobiography (London : Unwin Paperbacks, 1978) P. 9

5. William Shakespeare's Hamlet, Act I, Sc. 5

6. J. Krishnamurti, Letters to the Schools, P. 17

7. Bertrand Russell, Autobiography, P. 9

8. Quoted by Gavin Kitching in his Karl Marx and the Philosophy of praxis (London : Routledge, 1988, P. 29

9. झ्याँ–झ्याक रूसो, सामाजिक करार, अनु. व. भ. कर्णिक (मुंबई : महाराष्ट्र राज्य साहित्य–संस्कृति मंडळ, 1972), पृ. 1

10. कित्ता, पृ. 2

11. Henry David Thoreau, Walden (New Delhi : S. Chands and Co; 1964), P. 290

12. मानवेंद्रनाथ रॉय, नवमानवतावाद, अनु. गोवर्धन पारीख (वाई : प्राज्ञपाठ शाळा, 1955), पृ. 111–12

13. Jawaharlal Nehru's Speeches (New Delhi : Publications Division, Ministry of Information and Broadcasting, f. b. 1949, third impreession 1967), P. 33

14. Jawaharlal Nehru, The Discovery of India (New Delhi : Oxford University Press, fb. 1946, third impression 1982), P. 521

15. Ibid, P. 521

(परामर्शवरुन साभार)

***



# विचारवंतांची समाजातील भूमिका

डॉ. सूर्यनारायण रणसुभे

कोणत्याही समाजाची विभागणी 'विचारवंत' आणि 'विचार शून्य' अशा दोन टोकाच्या वर्गात कधीच होत नसते. किंवहुना तशी स्थिती कोठेच नसते. समाज–व्यवस्थेत जगणारा प्रत्येकजण आपापल्या परीने विचार करीतच असतो. व्यक्त देखील करीत असतो. असे असताना काहींजणानाच 'विचारवंत' हे बिरुद लावले जाते. हे बिरुद ती व्यक्ती स्वत: लावित नसते. तर इतर घटक या विशेषणाने त्याला संबोधू लागतात. म्हणजे समाज हा स्वत:च्या सोयीसाठी म्हणा किंवा गरज म्हणून म्हणा किंवा आदर आणि श्रद्धेमुळे म्हणा आपल्यातील काहीं विशेष व्यक्तींना विचारवंत म्हणून संबोधित असतो. असे करण्यामागे त्याची कोणती भूमिका असते हे तपासून पाहणे गरजेचे असते. 'विचारवंत' म्हणजे 'असामान्य बुद्धिमान' माणूस नव्हे. विचारवंत थोडेफार बुद्धिमान असतात कदाचित ! पण प्रत्येक असामान्य बुद्धिमत्तेचा माणूस हा विचारवंत म्हणवला जाईलच असे नव्हे आणि प्रत्येक विचारवंत हा असामान्य बुद्धिमान असेल असेही नव्हे. अचाट बुद्धिमत्तेच्या शास्त्रज्ञांना, तल्लख बुद्धिच्या राजकीय नेत्याना किंवा अचूक निर्णय घेण्याची क्षमता असणाऱ्या आर्थिक गुन्हेगारांना विचारवंत म्हणून संबोधण्यात येत नसते. याचा अर्थ असा झाला की विचारवंत हा बुद्धिवंतांपेक्षा काही वेगळी भूमिका मांडत असावा.

'बुद्धिमान,' 'ज्ञानी' आणि 'विचारवंत' या तीन शब्दातील फरक लक्षात घेणे आवश्यक आहे. समाजाला या सर्व घटकांची सतत गरज भासत असते. बुद्धिमत्तेची काहीं विशिष्ट क्षेत्रे असतात असे नव्हे. तर प्रत्येक क्षेत्रात बुद्धिमत्तेला आव्हान असते.

बुद्धिमान माणसे कोणत्याही क्षेत्रात गेली की त्या क्षेत्रात ते भरीव कामगिरी करीत असतात आणि त्यातून समाज भरभराटीस येत असतो. बुद्धिमत्तेचा संबंध संशोधन, व्यापार, उत्पादन, सेवाक्षेत्र, राजकारण अर्थात जीवनाला व्यापून टाकणारी सर्वच क्षेत्रे असतात. या क्षेत्रातील पारंपारिक पद्धतीस छेद देऊन बुद्धिमान माणूस आपल्या चिंतनातून, प्रयोगातून निरीक्षण आणि विश्लेषणातून नवी पद्धत जन्माला घालतो. आणि त्यामुळे त्या क्षेत्रात गतिमानता येते. या मर्यादित अर्थाने बुद्धिमत्तेचे क्षेत्र हे उत्पादन, संशोधन, निर्मिती याच्याशी संबंधित असते.

'ज्ञानी' माणूस हा ज्ञानाचे एक मर्यादित असे क्षेत्र निवडून त्यात स्वतःला गाढून घेत असतो. ही एक तपस्याच असते. पण या तपस्येचा संबंध वैयक्तिक मोक्षासाठी नसतो. तर ज्ञानाच्या त्या विशिष्ट क्षेत्राच्या परंपरेचा शोध घेणे, त्यास सुसंगतपणे मांडणे, त्यातील विसंगती दाखवणे आणि नवीन सूत्रांची, सिद्धांताची, तत्त्वज्ञानाची मांडणी करीत जाणे अशी ही प्रक्रिया चालत असते. एका अर्थाने ज्ञानी किंवा विद्वान मंडळी ही सिद्धांत पक्षाच्या अभ्यासात गुंतलेली असतात तर बुद्धिमान माणसे या सिद्धांताच्या, सूत्राच्या आधारावर उत्पादन, निर्मिती किंवा अशाच भौतिक प्रगतीच्या प्रयत्नात असतात.

बुद्धिमान आणि ज्ञानी माणसाची जातकूळ एकच असते. अर्थात् दोघेही किमान बुद्धिमत्तेपेक्षा अधिक बुद्धिमत्ता बाळगून असतात. फक्त पहिला हा अधिक व्यवहारी असतो तर दुसरा कमी व्यवहारी असतो. बुद्धिमानांना ज्ञानी मंडळीची सतत गरज भासत असते. ज्ञानी मंडळींना मात्र बुद्धिमानाची गरज भासतच असते असे नव्हे. समाजाची भौतिक आणि सांस्कृतिक जडण-घडण करण्यात दोघांचा सिंहाचा वाटा असतो. अर्थात् ही जडण-घडण कळत-नकळत होत असते. अगदी अनादि अनंत काळापासून हे दोन घटक आपल्या परीने समाजाला आकार देत आलेली आहे. आपल्याकडील ऋषी-मुनी आणि आचार्य हे 'ज्ञानी'च्या सदरात मोडतात आणि राजे-महाराजे, उद्योग-व्यवसाय करणारे, हे 'बुद्धिमान' वर्गात मोडतात.

'विचारवंत' हा ज्ञानी आणि बुद्धिमान वर्गापेक्षा नेमका कोठे वेगळा पडतो हे आता पहायचे आहे. पहिली गोष्ट ही की विचारवंत हा असामान्य बुद्धिमत्तेचा असायलाच पाहिजे असे नाही. किंवा एखाद्या विषयातील फार मोठा तज्ञ किंवा प्रकांड पंडित असला पाहिजे असेही नव्हे. ज्ञान आणि बुद्धिमत्ता हे तर त्याच्या अंगी असावयास हवेत. या तीन्ही गटात सारखेपणा असणारे हे दोन घटक तर महत्त्वाचे आहेतच. पण या तिघांत विचारवंत हा कोठे वेगळा भासतो किंवा असतो हा महत्त्वाचा प्रश्न आहे. एकदा का त्याचे वेगळेपण स्पष्ट झाले की मग त्याची भूमिका देखील नक्की होते. त्याच्यां वेगळेपणातच त्याची भूमिका दडलेली आहे.

बुद्धिमान आणि ज्ञानी माणसे ही परंपरेचा व परंपरेतून आलेल्या ज्ञानाचा उपयोग ऐहिक सुख समृद्धीसाठी करीत असतात. हे काहीं वावगे नसते. उलट संपूर्ण समाजाची ऐहिक सुख समृद्धी ही मानवी जीवनाची उत्कट अशी अभिलाषा आहे. प्रश्न याच्याही पुढचा असतो. प्रत्येक समाजाची हळू-हळू एक विशिष्ट अशी चौकट तयार होत असते. यालाच आपण 'प्रस्थापित समाज व्यवस्था' म्हणत असतो. या प्रस्थापित समाज व्यवस्थेत अनेकांवर अन्याय होत असतात. शोषण चालत असते. विषमता वाढू लागते. लिंग, वंश, जात, वर्ण, धर्म परंपरेतून आलेल्या या वेगवेगळ्या घटकांच्या आधारे समाजातील प्रस्थापित वर्ग इतरांचे शोषण करीत असतो. किंवा त्यांना अनेक सोयी सुविधापासून दूर सारत असतो. सर्व सुख सोयी स्वत:कडे स्वत:च्या जाती-वर्णाकडे ओढून घेत असतो. किंवा अत्यंत धूर्तपणे समाजाची रचनाच अशी करुन टाकतो की इतर कोणालाही कसलेच फायदे घेता येऊ नयेत. सर्व समाजच त्याच्या पुढे गुलामाप्रमाणें उभा ठाकेल असे तत्त्वज्ञान तो रचतो आणि त्याचा सतत प्रचार करीत जातो. हळू-हळू या समाजव्यवस्थेची पकड इतकी घट्ट होऊन जाते की इतरांना काहीं अधिकारच शिल्लक राहत नाहीत. केवळ कर्तव्य किंवा श्रम करणे आणि जगणे यापलीकडे त्यांच्या जीवनाला कसलाच अर्थ उरत नाही.

विचारवंतांची भूमिका अगदी येथूनच सुरु होते. बुद्धिमान आणि ज्ञानी माणसे आत्मकेंद्रीत होऊन जगू शकतात. ज्ञानाची अखंड उपासना करीत असताना आपल्या वर्तमानाशी फारकत घेऊन ते जगू शकतात. किंबहुना ती तशी जगतात. तशी जगतात म्हणून त्या क्षेत्रात ती भरीव कामगिरी करुन दाखवतात. त्यामुळे समाज व्यवस्थेपासून अलिप्त राहिले म्हणून त्यांची टीका करण्यात अर्थ नसतो. बुद्धिमान माणसे देखील आपल्याच व्यवसायात दंग असतात. व्यवस्थेविषयी त्यांना राग जरी येत असला, तरी व्यवस्था बदलण्यासाठी म्हणून ते स्वत: फारसे क्रियाशील होत नसतात. किंवा या संबंधी तीव्र तोंडी प्रतिक्रिया देखील देण्यास ते धजत नसतात. अर्थात् सर्वच बुद्धिमान आणि ज्ञानी मंडळी अशी असतात असे म्हणणे नाही. पण सर्वसाधारणपणे असे चित्र मात्र नक्कीच आहे.

विचारवंत मात्र व्यवस्थेविषयी खूप संवेदनक्षम असतो. त्याची सर्व धडपड ही व्यवस्थेच्या पुनर्रबांधणीची असते. माणूस, निसर्ग, परंपरा, धर्म, विज्ञान एका शब्दात म्हणायचे म्हणजे माणसांशी जे-जे निगडित आहे त्याची कठोरपणे तो चिकित्सा करीत असतो. माणसाची आज जी स्थिती झालेली आहे, त्यातून तो अस्वस्थ होत जातो. अन्याय, अत्याचार, शोषण, पक्षपात ही सगळी जी मानव विरोधी कृत्ये आहेत, याचा शोध तो घेत जातो. एका संशोधकाच्या वृत्तीने तो परंपरेचा अभ्यास करतो. कोठून अन्याय-अत्याचाराची सुरवात झाली, यातून कोणाचे फायदे होत असते, कोणाचे हितसंबंध कोठे अडकलेले आहेत, याचा ताळेबंद तो

समाजासमोर मांडत जातो. एका पातळीवर परंपरेचा, इतिहासाचा शोध घेत जाणे, दुसऱ्या पातळीवर वर्तमानातील विसंगती स्पष्ट करणे आणि तिसऱ्या पातळीवर हे सर्व टाळून माणसाला अधिक सुखी करण्यासाठी म्हणून कोणती पाऊले उचलावी लागतील हे तो स्पष्ट करुन सांगत असतो. एका अर्थाने विचारवंत म्हणजे एक अस्वस्थ आत्माच. अगदी अस्वस्थात्मा सारखा. सतत भळभळणारी जखम घेऊन जगणारा. पण जीवनाबद्दल कसलीच निराशा न बाळगणारा. त्यामुळे विचारवंत हा व्यवस्थेची केवळ व्याख्या करुन थांबत नसतो, तर त्याच्या नव–निर्मितीसाठी धडपडत असतो. 'जे प्रत्यक्ष आहे' त्यापेक्षा अधिक चांगले व्हावे ही त्याची प्रामाणिक इच्छा असते. अशी इच्छा तर समाजातील प्रत्येक व्यक्ती बाळगत असते. पण इतरेजणात आणि विचारवंतांत एक मूलभूत फरक असतो. विचारवंत आपली मांडणी भावनेच्या आधारावर करीत नसतो. तर त्या-त्या क्षेत्राचा त्याचा खूप असा अभ्यास असतो. या अभ्यासातून निघालेल्या निष्कर्षांना तो वर्तमानाशी जुळवून पहात असतो. आणि त्यातून उद्भवणाऱ्या अंतर्गत विसंगतीना तो स्पष्ट करीत असतो.

विचारवंताची भूमिका ही प्रबोधनाची असते. या प्रबोधनामागची भूमिका ही माणसासंबंधाच्या भूमिकेशी सुसंगत अशी असते. त्याची भूमिका ही केवळ 'माणूस' हा केंद्रबिंदू ठरवूनच सुरु होते. त्यामुळे धर्म, जात, वंश, लिंग आणि बऱ्याचदा राष्ट्र याच्या पलीकडे जाऊन केवळ माणसाशीच तो आपले नाते सांगत असतो. वैश्विक मानवाची भूमिका मांडत असताना आधी त्याची चिंता त्याच्या भोवती असलेल्या माणसासंबंधीची असते. या माणसावर जेथे–जेथे अन्याय, अत्याचार, शोषण आणि अमानवीय व्यवहार झालेले असतील, ते सर्व तो पूर्णपणे अलिप्त होऊन मांडत असतो. जेवढे अत्याचार क्रूर तेवढाच तो अधिक आक्रमक होतो. त्यामुळे विचारवंताचे एक लक्षण 'आक्रमकता' हे ही असते. ही आक्रमकता माणसासंबंधींच्या जिव्हाळ्यातून निर्माण झालेली असते. तो आपली भूमिका मांडत असताना तो त्या सर्वांना उघडे–नागडे करीत जातो, जे माणसाला यातना देण्याच्या कामी प्रत्यक्ष–अप्रत्यक्षपणे मदत करीत असतात. कोणाचाच मुलाहिजा न ठेवता जी वस्तुस्थिती असते, ती निर्भिडपणे आणि रोखठोक शब्दात मांडणे ही विचारवंताची भूमिका असावी लागते.

येथे विचारवंत आणि कार्यकर्ता यातील फरक लक्षात घेणे महत्त्वाचे आहे. विचारवंताची बांधिलकी आणि निष्ठा केवळ 'भावना' किंवा 'श्रद्धा' यावर आधारलेली नसते. अवती–भोवतीच्या समाजरचनेकडे पहात असताना, त्याच्या संवेदनशील मनावर जे आघात होतात, त्यातून जी अस्वस्थता निर्माण होते, या अस्वथतेमुळे तो परंपरा, धर्म, समाजरचना याचा अभ्यासाच्या पातळीवर शोध घेत जातो आणि

यातून त्याची बांधिलकी तयार होत असते. सर्वसामान्य माणसाचे भयानक शोषण, होत असते, अन्याय–अत्याचार होत असतात. समाजातील काही गटच सर्व सोयी–सवलती लाटत असतात. त्याच्या विरुद्ध त्याचे मत पेटून उठते. या पेटण्यामागे संपूर्ण व्यवस्थेचा अभ्यास असतो, तर्क संगती असते. म्हणून विचारवंताची वैचारिक बैठक पक्की असावी लागते. या बैठकीसाठी त्याला अभ्यास करावा लागतो. विसं–गती शोधून काढाव्या लागतात. शोषण आणि अन्याय करणाऱ्या शक्तींना उघडे पाडावे लागते. त्यानंतर समविचारी मंडळीत बसून आपल्या विचारांना अधिक तर्क–संगत, अधिक शुद्ध करुन घ्यावे लागते. ही सतत चालणारी प्रक्रिया यानंतर विचार पक्व, सुसंगत झाले की लोकांपर्यंत, लोकांच्यामध्ये जावे लागते, येथेच कार्यकर्ता, विद्वान आणि विचारवंत यांच्यातील सीमारेषा स्पष्ट होतात. कार्यकर्ता हा विचार–वंताकडून प्रेरणा, विचार आणि तर्कसंगत मांडणी घेऊन लोकांच्यापर्यंत जात असतो. विद्वान हा आपल्याच कोषात जगत असतो. पण एका अर्थाने तो विचारवंत याच्याशी संपर्क साधत असतो. कार्यकर्त्याचे ऊर्जा केंद्र–'विचारवंत' असतो. तर विचारवंताच्या मांडणीस विद्वान साहयभूत ठरत असतो. पण विचारवंत हा हस्तीदंती मनोऱ्यात राहणे कधीच पसंद करीत नसतो. तो लोकांच्यापर्यंत जातो, त्यांच्यांशी संवाद साधत असतो, जनमासात जाऊन आपली मांडणी जरा जरा तपासून घेत असतो. जन–सामान्यात तो कोणत्या प्रकारे जाईल ? महाराष्ट्र आणि देशाच्या अनेक प्रांताच्या सामाजिक सुधारणेचा इतिहास पाहिल्यास लक्षात येईल की स्वातंत्र्यापूर्वी विचारवंतांनी आपल्या विचाराच्या प्रचार प्रसारासाठी वृत्तपत्रे, नियतकालिके या माध्यमाचा प्रभावी वापर केलेला आहे. व्याख्यानाच्या निमित्ताने लोकांच्यापर्यंत जाणे (अर्थात् अशि–क्षित सर्वसामान्य माणसापर्यंत) आणि वृत्तपत्राच्या माध्यमाने सुशिक्षितापर्यंत लोक–हितवादी, टिळक, आगरकर, डॉ. बाबासाहेब आंबेडकर, म. गांधी, र. धो. कर्वे अशी अनेक नावे देता येतील म. जोतिबा फुले छोटया पुस्तिकेच्या मध्यमातून आणि व्याख्यानातून लोकांपर्यंत जाण्यासाठी धडपडत असत. ही धडपड समाजाच्या पुनर्र–चनेसाठी होती हे स्पष्टपणे आजही दिसते.

अभ्यास, मांडणी आणि जनतेपर्यंत जाणें ही विचारवंताची लक्षणे. यासाठी त्याला विद्वानांच्या सतत संपर्कात रहावे लागते. या दोघाना बुद्धिमान माणसाची जोड मिळाली की मग विचारवंत सहजपणे आपल्या ध्येयापर्यंत पोहचू शकतो. अर्थात् या तीन घटकात हा जो फरक करण्यात आलेला आहे, तो केवळ प्रत्येकाची भूमिका तपासून पहाण्यासाठी म्हणून. यातून असा बालिश निष्कर्ष काढण्याची गरज नाही की विचारवंत हा बुद्धिमान नसतो किंवा विद्वान हा विचारवंत नसतो. यांच्यातील सीमारेषा बऱ्याचदा खूप पुसट होत जातात. एकच व्यक्ती एकाच वेळी तीनही भूमिकेत वावरत असते. हे तिघेही सामान्य बुद्धिमत्तेपेक्षा वरच्या पातळीवरचे

आहेत. एवढे जरी लक्षात ठेवले तरी या तिघांची श्रेष्ठ–कनिष्ठतेची श्रेणी ठरवणे किती अवघड असते हे स्पष्ट होईल.

॥ २ ॥

उपरोक्त सैद्धांतिक मांडणीनंतर आता प्रश्न आजच्या संदर्भात विचारवंताची भूमिका तपासून पहाण्याचा आहे. पहिली बाब ही की आजही समाजात हा वर्ग आपल्या परीने धडपडण्याचा प्रयत्न करीत आहे. पण या धडपडण्यावर खूप मर्यादा पडत आहेत. स्वातंत्र्यापूर्वीचा विचारवंत हा अनेक हाल–अपेष्टा सहन करुन लोकांच्यापर्यंत जाण्याचा प्रयत्न करीत होता. यापैकी काहीं विचारवंतांना समृद्धीचा वारसा लाभल्यामुळे त्याना लोकांच्यापर्यंत जाण्यात कसल्याच अडचणी निर्माण झाल्या नाहीत. (उदा. राजाराम मोहन रॉय आणि बंगालचे जवळपास सर्व समाजसुधारक) त्यावेळी ही मंडळी स्वतःची वृत्तपत्रे/नियतकालिके काढीत. त्यावर त्यांचे पूर्ण नियंत्रण असे. पण आजच्या व्यवस्थेत विचारवंत आणि इतरेजनात 'प्रसार माध्यमे' आणि 'माध्यमातील मंडळी' उभी असते. यावर त्यांचेच नियंत्रण असते. त्यामुळे एखाद्या विचारवंताचे विचार लोकांपर्यंत जाऊ द्यायचे की नाही याचा निर्णय ही मंडळी घेतात. उदा. म्हणून आज महाराष्ट्रात हिंदू तत्त्वज्ञान आणि सार्वजनिक जीवनात त्याची गरज या संबंधीची अभ्यासपूर्ण (?) मांडणी श्री. सं. ह. देशपांडे करीत असतात. अगदी त्याचवेळी ही मांडणी कशी चुकीची, समाजविघातक व वर्णव्यवस्थेच्या पुनरागमनाची आहे, हे अगदी तर्कशुद्धपणे, पुराव्यासहित श्री. रावसाहेब कसबे मांडत असपतात. आता वृत्तपची मालकी ज्यांच्या हातात आहे किंवा संपादक किंवा त्या विभागातील इतर यापैकी ज्याचे हितसंबंध सं. ह. देशपांडेच्या मांडणीत आहेत, त्यांचेच विचार लोकांपर्यंत जाणार. त्यामुळे त्यांचा लेख विस्ताराने आणि कसबेंचा लेख संक्षेपाने किंवा त्यातील महत्त्वाचा भाग गाळून छापला जाण्याची शक्यता असते आणि या प्रकारे विचारवंताची गळचेपी होत असल्याचे आपल्यास दिसून येईल. व्याख्यानाच्या माध्यमाने लोकांपर्यंत जाणे अगदी सोपे असते, पण एकूण जीवन पद्धतीच एवढी बदललेली आहे की राजकीय नेत्यांच्या भाषणाला जेथे लोक उपस्थित राहू शकत नाहीत, तेथे विचारवंताच्या भाषणाला प्रतिसाद मिळणे अवघड. जीवन इतके गुंतागुंतीचे झालेले आहे की इतर ठिकाणी जाऊन व्याख्यान ऐकणे सहज शक्य राहिलेले नाही. त्यामुळे बिछान्यावर पडल्या-पडल्या किंवा प्रवासात लेख वाचणे सहज शक्य असते. आणि या माध्यमावर तर इतरांचेच वर्चस्व राहिलेले आहे. आणि यामुळेच विचारवंत हा हळू–हळू एकटा पडत चालला आहे.

॥ ३ ॥

आजच्या समाजव्यवस्थेत विचारवंताची नेमकी भूमिका काय ? ही भूमिका

पार पाडण्यात तो कोठे कमी पडत आहे काय, त्याच्या समोर कोणत्या अडचणी येत आहेत किंवा कोणत्या दृश्य–अदृश्य शक्ती त्याच्या विरोधात उभ्या आहेत, याचा शोध देखील आवश्यक आहे. कालानुरुप आणि युगानुरुप विचारवंताची भूमिका बदलत नसते. त्याची भूमिका एकच असते, असावी लागते आणि ती म्हणजे 'आहे त्या व्यवस्थेत बदल,' 'असा बदल ज्यात माणासावर धर्म, श्रम, अन्न, किंवा इतर कोणत्याही कारणामुळे अन्याय होऊ नये, शोषण होऊ नये.' सर्वसामान्यच नव्हे तर एकूण माणसाच्या कल्याणासाठी तो सतत एक आग्रही अशी भूमिका घेत असतो. भगवान बुद्ध, कबीर, म. फुले, म. गांधी, डॉ. आंबेडकर ही आणि अशी शेकडो मंडळी या यादीत येतात. आता पुढचा प्रश्न असा की ही भूमिका पार पाडण्यात तो कोठे कमी पडतो काय असा आहे. आणि आजच्या संदर्भात त्याचे उत्तर असे आहे की अलीकडे तो खूपच कमी पडत चालला आहे.

जगातील बहुतेक सर्व धर्माच्या अनुयायांचा प्रत्यक्ष व्यवहार हा माणुसकीला काळिमा फासणारा राहिलेला आहे. धर्माचा इतिहास हा रक्तरंजित राहिलेला आहे. वैयक्तिक जीवनात धर्माचे अनन्यसाधारण महत्व जरी असले तरी धर्म एकदा का सार्वजनिक जीवनात आला की मग श्रेष्ठ–कनिष्ठता, उच्च–नीच, वेगवेगळ्या पातळीवरचे अहंकार, धर्मा–धर्मातील अनुयायात द्वेष–तिरस्कार इत्यादी भावना उफाळून वर येतात. प्रत्येक देशात धर्मप्रमुख आणि विचारवंत यात सातत्याने संघर्ष चाललेला दिसून येतो. कारण विचारवंत कोणत्याही विशिष्ट धर्माच्या बाजूने उभा रहात नसतो; तो माणसांच्या बाजुने उभा राहतो. हे धर्मप्रमुखांना नको असते. त्यामुळे संघर्ष सुरु होतो. माणसाच्या ज्ञात इतिहासाच्या अभ्यासावरुन असे दिसून येईल की धर्मावर आधारित राज्ये किंवा धर्मद्वारे नियंत्रित राज्ये ही कधीही सर्वसामान्य माणसाला सुख देऊ शकलेली नाहीत. अनेक अभ्यासकांनी, पुराव्या–सहित धर्माधिष्ठित राज्यांच्या मर्यादा स्पष्ट केलेल्या आहेत. एवढे सर्व असताना देखील आज या देशातील काहीं विचारवंत उघड उघड धर्माधिष्ठित राज्याचे समर्थन करीत आहेत किंवा धर्मास सार्वजनिक जीवनात आणण्याची गरज दाखवित आहेत. त्यावेळी याना विचारवंत तरी का म्हणावे असा प्रश्न उभा राहतो. मागील शेकडो वर्षापासून या देशातील विचारवंतांनी धर्म, जात, वर्ण, वंश या घटकांना उंबरठयाच्या आत नेऊन ठेवण्याचा प्रामाणिक प्रयत्न केलेला आहे. पण मागील १०–१५ वर्षापासून या देशातील तथाकथित विचारवंत (अगदी स. ह. देशपांडे पासून ते अरुण शौरी पर्यंत) धर्माच्या सार्वजनिक पुनरुज्जीवनाचा प्रयत्न करीत आहेत. इस्लाम मधील मूलतत्त्ववादी तर जगभरच असा प्रयत्न करीत असल्याचे दिसून येईल. सर्वच धर्मा–तील अनेक विचारवंत धर्मप्रमुखाच्या छायेखाली तरी वावरत असतात किंवा प्रत्यक्ष अप्रत्यक्षपणे धर्माच्या सार्वजनीकीकरणाचा आग्रह धरत असतात. वैयक्तिक जीवनात

धर्माचे खूप महत्व असते. आणि ते सतत राहिल देखील. खाजगी जीवनात धर्मा-चरणाचा विरोध कुठल्याच विचारवंताने केलेला नाही. विरोध धर्माच्या राजकीय उपयोगाचा व्हावयास हवा. त्याच्या सार्वजानीकीकरणाचा व्हावयास हवा. सर्व-सामान्यांना यातील धोके लक्षात आणून देण्याची जबाबदारी ही विचारवंतांची असते. एकेकाळी ही भूमिका येथील विचारवंतांनी प्रामाणिकपणे पार पाडलेली आहे. पण आज राष्ट्रीय स्वयं संघातील बौद्धिके घेणारी मंडळी, भाजप आणि हिंदुत्ववाद्यांची खुशामत करण्यात धन्यता मांडणारी तथाकथित विचारवंत मंडळी सतत हिंदू धर्माच्या श्रेष्ठतेचे तत्त्वज्ञान मांडत बसलेली आहेत. कधी काळी अशी मांडणी स्वा. सावरकरांनी केलेली होती. आता सावरकरांचे तत्त्वज्ञान किती श्रेष्ठ पातळीवरचे होते व आहे असे मांडणारे विचारवंत देखील तयार होत आहेत त्यांची ही भूमिका या देशाला कितपत परवडणार आहे याचा विचार होणे गरजेचे आहे.

॥ ४ ॥

राजकारण हा घटक विचारवंतास अडचणीचा ठरत आहे. सच्च्या विचारवंता-कडून ही अपेक्षा असते की तो निर्भिड असावा। अभ्यासातून अगदी तर्कसंगत अशी भूमिका त्याने मांडावी, त्याच्या चिंतनाचा केंद्रबिंदू माणूस असावा. पण आज वस्तु-स्थिती काय दाखवते. या देशातले बहुतेक विचारवंत हे विशिष्ट 'धर्माचे' धर्मांच्या नावावर राजकारण करणाऱ्या पक्षाचे किंवा जात, वर्ण, वंश किंवा काळया पैशाच्या आधारावर राजकारण करणाऱ्या पक्षाचे 'प्रवक्ते' मात्र होत आहेत. याचा अर्थ या सर्वांच्या पलीकडे जाऊन मांडणी करणारे विचारवंत नाहीत असे नाही. सुदैवाने अशांची संख्या देखील भरपूर आहे. पण एकतर प्रसार–माध्यमे यांची पूर्ण उपेक्षा करतात आणि बहुसंख्येनी असलेले तथाकथित विचारवंत यांचे विचार विकृत करुन लोकांसमोर मांडतात किंवा त्याना लोकांपर्यंत येऊ न देण्यात पुढाकार घेतात.

हे झाले सच्च्या निखळ विचारवंतांबद्दल. पण या सोबत ही देखील वस्तु-स्थिती आहे की आज जागोजागी विचारवंताची फौज उभी रहात आहे. प्रसार माध्यमे अगदी कमी वेळात कोणालाही 'विचारवंत' म्हणून राज्यभर प्रतिष्ठित करु शकतात. राजकारणी मंडळीच्या जवळ जाऊन काहीं मंडळी विचारवंताचे प्रमाणपत्र मिळवतात. शिक्षणाच्या प्रसाराबरोबर महाविद्यालयांची संख्या वाढू लागली आणि या म. वि. तून अध्यापन करणाऱ्या, पाठ्यक्रमाशिवाय काहीही न वाचणाऱ्या प्राध्यापकापेक्षा दहा पाच पुस्तके अधिक वाचलेला, पी. एच. डी. ची पदवी मिळवलेला (?) पाच दहा ठिकाणी व्याख्याने देऊ लागला की एकदम 'विचारवंत' ठरतो किंवा ठरविला जातो. मग हा आपल्याच अहंकारात जगू लागतो. धड विचाराशी बांधिलकी नसते, प्रामाणिकपणा नसतो आणि सामान्यजनाबद्दल आत्मी-यता नसते, हे असले विचारवंत या प्रतिष्ठेचा वापर स्वतःचे हितसंबंध सुरक्षित

ठेवण्यासाठी व आर्थिक फायदे करुन घेण्यासाठी करीत असतात.

परिस्थिती कितीही प्रतिकूल असली तरी विचारवंत आपल्या निष्ठेशी कधीच अप्रामाणिक रहात नाही. आणि कितीही एकटा पडत गेला तरी जे कठोर वास्तव आहे आणि जे त्याला मनोमन पटत असते, ते तो ठणकावून सांगत असतो किंवा लिहित असतो. अर्थात विचारवंत लाटेवर आरुढ होत नसतो. पण आजचे वास्तव काय दर्शवते ? कालपर्यंत धर्माच्या राजकारणावर आग पाखडणारी मंडळी महाराष्ट्रात युतीचे सरकार आले की धर्माच्या महत्त्वावद्दल बोलू लागलेली आहेत. कालपर्यंत मुक्त अर्थव्यवस्थेवर कठोर हल्ला करणारी आज त्याचे गोडवे गाऊ लागलेली आहेत.

एका अर्थाने महाराष्ट्रात आणि देशात ढोंगी व खोटया विचारवंतांची (सुडो थिंकर्स) ची संख्या वाढू लागलेली आहे. सर्वसामान्यापर्यंत पोहचण्याची त्यांची धडपड देखील कमी होत चालली आहे. याला कारणे अनेक असतील व आहेत. व्यवस्थेच्या प्रत्येक घटकातील प्रामाणिकपणा व बांधिलकी कमी होत असताना केवळ या वर्गाकडून अपेक्षा करणे कितपत योग्य ठरेल हा मुद्दा आहेच. व्यवस्थेच्या सर्व घटकात हा जो बदल घडत आहे, मूल्यांची जी घसरण चालू आहे, त्याची सर्व बाजूने चर्चा करणे व या बदलत्या व्यवस्थेच्या विरोधात जनमत उभारणे हेच तर विचारवंतांचे कर्तव्य आहे. ते या कर्तव्यापासून दुरावले जात आहेत की व्यवस्थाच इतकी क्रूर व संवेदनशून्य होत चाललेली आहे की जेणेकरुन त्यांच्याकडे कोणाचे लक्षच जाईनासे झालेले आहे. याचा विचार होणे ही गरजेचे आहे.

॥ ५ ॥

विचारवंत हा त्या-त्या व्यवस्थेतून उभा रहात असतो. तो काही आकाशातून येत नसतो तर तो त्या व्यवस्थेचा भाग असतो. इतर मंडळी व्यवस्थेच्या प्रवाहासोबत जात असतात. तर विचारवंत या प्रवाहाच्या कडेवर उभा राहून त्याचे निरीक्षण करीत असतो, त्याच्या संगती-विसंगतीकडे लोकांचे लक्ष वेधत असतो. सर्वसामान्य माणसाशी बांधिलकी पत्करुन त्याच्या हक्कासाठी, न्यायासाठी धडपडत असतो. पण हे सर्व करीत असताना त्याचे स्वतःचे असे वैयक्तिक जीवन असते, कौटुंबिक जबाबदाऱ्या असतात, ताण-तणाव असतात, स्वतःच्या आणि कुटुंबाच्या अस्तित्वाचा आणि सुरक्षिततेचा प्रश्न ही त्याच्या समोर असतो. विचारवंत म्हणून आपली भूमिका मांडत असताना त्याच्या या वैयक्तिक जीवनाकडे कोणी फारसे डोकवून बघत नसतात. स्वातंत्र्यपूर्व काळातील बहुतेक विचारवंत हे सांपत्तिक व सामाजिक दृष्टया खूप वरच्या थरातून आलेले होते. संयुक्त कुटुंब व्यवस्थेमुळे त्यांच्या जबाबदाऱ्या पार पाडणारे इतर कुटुंबीय होते. यात आगरकर, डॉ. आंबेडकर म. फुले, र. धो. कर्वे सारखी काहीं अपवादात्मक मंडळी जरुर होती. पण त्यावेळचा

समाज हा आजच्या मानाने अधिक संवेदनशील होता आणि म्हणून ते टिकू शकले. आजच्या व्यवस्थेत विचारवंताला सुरक्षितता देण्याइतकी संवेदनशीलता टिकून आहे काय ? त्याला आर्थिक स्थैर्यच मिळत नसेल तर अशावेळी त्यांने काय करावे ?

॥ ६ ॥

अर्थात् खूप काहीं किडलेले, नासलेले आहे अशातला भाग नाही. समाज मत जागृत करण्याची प्रक्रिया ही अखंडपणे चालतच असते. व्यवस्थेचे विवेचन, विश्लेषण करण्याची गरज देखील सतत चालत असते. त्यामुळे विचारवंतांची गरज समाजाला ही असतेच. आणि समाजात संवेदनशील मने असलेली माणसे देखील असतात. विचाराच्या नावावर कोण कोणती भूमिका मांडत आहेत, भूमिका मांडण्यामागे त्याचे हितसंबंध गुंतलेले आहेत काय, आपल्या विचाराबद्दल तो ठाम भूमिका मांडतो काय, त्याच्यात वैचारिक गोंधळ तर नाही काय, प्रसंगानुरुप तो आपली भूमिका बदलत असतो काय, यावर बारकाईने लक्ष ठेवणाऱ्या असंख्य माणसांची गरज समाजात असते. समाजमन विचारवंतास तावून सुलाखून स्वीकारत असते. असा सावधपणाच विचारवंतावर अंकुश ठेवत असतो. त्यामुळे खोटी नाणी खऱ्या नाण्याची जांगा घेण्याचा धोका असतो. म्हणून विचारवंताच्या भूमिकेबतच संबंधित समाजातील सुशिक्षित, साक्षर व संवेदनशील जनतेची भूमिका देखील महत्त्वाची ठरत असते. त्यामुळे समाजावर विचारवंताच्या नियंत्रणाची जेवढी गरज आहे, तेवढीच गरज विचारवंतावर समाजमनाच्या नियंत्रणाची व विचारवंताच्या अस्तित्वाची आणि सुरक्षिततेची देखींल गरज आहे.

※※※



॥ १ ॥

# भारतातील सामाजिक परिवर्तनात समाजशास्त्रज्ञांची जबाबदारी

सुलभा ब्रम्हे

### स्थितीशील भारतीय समाज

भारतीय समाजाच्या स्थितीशील आर्थिक पाया जातीव्यवस्था व वतनदार-पद्धती तर वैचारिक आधार कर्मविपाक कल्पना. भारतीय समाजाची जातीबध्दता रोटी-वेटी व्यवहारातील कडकबंधनातून शेकडो पिढ्या टिकून राहिली आहे. जाती-मध्ये उच्चनीचत्वाची उतरंड आणि 'विटाळ' होणारी कामे वाट्याला आलेल्या जाती 'अस्पृश्य' मानल्या जात, तरीही जातीधर्माप्रमाणे वागण्याचे बंधन कर्मविपाकाचा दृढ पगडा आणि वहिष्कृत होण्याची धास्ती या दडपणाखाली टिकून राहिले. संतांनी अध्यात्मिक पातळीवर हे भेद नाकारले पण ऐहिक जीवनात ते कायम राहिले. गाव-गाड्यातले दैनंदिन अर्थव्यवहार बलुतेदारी पद्धतीने साचेबंद बनवलेले होते. त्यामध्ये प्रयोगशीलतेला, बदलाला वाव नव्हता.

भारतीय विचारधारा प्राय: अध्यात्मनिष्ठ होत्या. ज्ञान या संकल्पनेत अभि-प्रेत होते ब्रह्मज्ञान, आत्मबोध, भौतिकज्ञान नव्हे. ज्ञानोपासनेमध्ये वेदप्रामाण्य, शब्द-प्राभाण्य, परंपरा यांना महत्व असून वास्तवलक्षी, चिकित्सक, स्वतंत्र विचार यावर मुलभूत मर्यादा होत्या. प्रचलित समाजव्यवस्था स्वयंसिद्ध व शाश्वत आहे अशी शास्त्रकारांची दृष्टी होती. परिवर्तन व प्रगती या कल्पनांना तात्त्विक अधिष्ठान नव्हते. तेव्हा बदल म्हणजे स्वभावच्युती असे समीकरण बनले. प्राप्त परिस्थिती श्रद्धेने सहन करणे हा स्वधर्म अशा धारणेमुळे सर्वसामान्य जनतेत औदासिन्य व जडता आली. ऐहिक जीवनात प्रयत्न, चैतन्य, सर्जनशीलता याला महत्व आले नाही.

या चाकोरीबद्ध वतनदार पद्धती व जातीव्यवस्था यामध्ये समाज जखडलेला असल्याने मिरासदारीवृत्ती, जातीजातीत वैमनस्य व वेपर्वाई, एकाकीपणा वाढीस लागून समाज सत्त्वहीन, ईर्षाहीन बनला. परकीयांचे हल्ले निवारण्याचे सामर्थ्य नाही, उच्चनीच-तेमुळे परस्पर सहकार्य नाही, दुफळी व बेकी यामुळे समाज विकलांग बनला.

भारतीय अध्यात्मविचारात व्यक्तीची मुक्ती, तिने विश्वस्वरुपात विलीन होणे हे श्रेय असल्याने व्यक्ती व सर्व चराचर सृष्टी यांच्या दरम्यानच्या विशिष्ट समाज-समूहाला विचारात महत्वाचे स्थान मिळाले नाही. समाजधर्म, समाजकर्तव्ये याला महत्व नाही, समाज एकजिनसी, ध्येयप्रेरित नाही, राजेजहागिरदारांचे कोते शह-काटशहांचे झगडे अशा परिस्थितीचा फायदा उठवून ब्रिटिश साम्राज्यशहांनी भारत पादाक्रांत केला. ब्रिटिश साम्राज्य स्थापनेनंतर भारतीय शिक्षित वर्गात युरोपीय विद्या व शास्त्रीयज्ञान संपादन करण्याची गरज प्रतिपादली गेली, समाजसुधारणेचे वारे वाहू लागले. परंतु प्रमुख भारतीय पुढारी–विवेकानंद, अरविंद, टिळक, गांधी, विनोबा आदींनी आपली वैचारिक भूमिका मूलतः जुन्या हिंदुधर्मनीतीच्या तत्त्वावरच आधारली. परिणामी स्वातंत्र्यलढ्याच्या प्रक्रियेत काहीसा एकजुटीने समाज उभा राहिला तरी पारंपारिक जातीधर्मव्यवस्थेला धक्का पोचला नाही. स्वातंत्र्योत्तर काळात लोकशाही निवडणुकींच्या सत्तेच्या राजकारणात जातीचा आधार टिकवणे हेच राज्यकर्त्यांना किफायतशीर वाटून समाजातील जातीभेद, दुही, अगतिकता, पुढाऱ्यां-वरचे अवलंबन सत्ता टिकवण्यासाठी जोपासले जाऊ लागले. धार्मिक मूलतत्त्ववाद, धर्मांधता हा सत्ताकारणाचा वाढता आधार बनू लागला. त्यामुळे आजही पारंपरिक भारतीय समाजातील जाती, पंथ, धर्मभेद, फुटिरता, अलिप्तता, सामाजिकतेचा अभाव दुही, दुर्बलता ही वैगुण्ये तशीच राहिली आहेत. यामध्ये भर पडत आहे ती जागति-कीकरणाची नववसाहतवादी गुलामीच्या वेड्या भारतीय समाज अर्थव्यवस्थेभोवती आवळल्या जात आहेत.

विसाव्या शतकात बहुराष्ट्रीय कंपन्यांचे उद्योग–व्यापार–वित्तव्यवहारांचे जाळे वेगाने जगभर पसरु लागले. आणि सध्या जागतिकीकरणाच्या सापळ्यात संबंध जग अडकवले गेले आहे. बहुराष्ट्रीय कंपन्यांच्या वाढत्या नफ्याची 'गरज' भागवण्यासाठी सर्व जगातली निसर्ग संपत्ती ओरबाडून नष्ट केली जाते आहे. पृथ्वीच्या अस्तित्वाला धोका निर्माण करणारे प्रदूषण, श्रीमंतांची चैनचंगळ आणि बहुसंख्यांवर वाढते दारिद्र्य व उपासमार हे नवसाम्राज्यशाहीचे फलित आहे. यामध्ये पैसा व भोगलालसेमागे माणूस फिरतो, इतर माणसांपासून तो तोडला जातो अशी अमानवी, क्रूर व विनाशकारी समाजव्यवस्था जगभर पसरत आहे. अशा आक्र-मणाला तोंड देऊन, जागतिकीकरणाचा हल्ला थोपवून नवी समाज अर्थव्यवस्था उभी करण्याचे आव्हान भारतापुढे आहे.

## परिवर्तनाचे आव्हान

समाजपरिवर्तनाचा उद्देश अखिल मानवसमाजासाठी शांतता, न्याय, समानता, संपन्नता व निर्भयता निर्माण करणे. सर्व स्त्री-पुरुषांना समृद्ध जीवन व अर्थपूर्ण काम सृजनशील सांस्कृतिक विकास, आनंददायी समाजजीवन लाभेल, समाजातील नाती सहभावाची, सहकार्याची असतील, निसर्गसंपत्तीचा वापर चिरस्थाई पद्धतीने केला जाईल या हेतूने परिवर्तन घडवायचे ध्येय आपणापुढे आहे.

अशा समाज परिवर्तनामधील भारतातील प्रमुख समस्या म्हणजे ब्राम्हणवादी व जातीव्यवस्थेचा पगडा आणि साम्राज्याला व त्यांना सामील असलेले भारतातील भांडवलशहा-सामंतशहा अजूनही भारतामध्ये शुद्रातिशूद्र व स्त्रीदास्यत्वाच्या परंपरेने आखून दिलेला 'धर्म' बहुसंख्य श्रमिक पुरुष व स्त्रियांना पाळावा लागतो. परिस्थिती बदलायला, आपले जीवन घडवायला वावच मिळत नाही. नागरीकरण व उद्योगी-करणाच्या प्रक्रियेत पारंपारिक बंधनांचे पाश बरेच ढिले होतील असे गृहीत होते, परंतु भारतात तसे चित्र दिसत नाही. या परिस्थितीमध्ये बदल घडवून आणण्या-साठी प्रथम गरज म्हणजे स्त्रिया व भूमिहीन शेतमजूर यांचे जमिनीवर हक्क शाबीत करणे, उत्पादनसंबंध बदलून ग्रामीण समाज अर्थव्यवस्थेची पुनर्रचना करणे यासाठी श्रमिकांचे संघटन व आंदोलन यांची परिश्रमपूर्वक बांधणी, जमीन, पाणी, जंगल, जल-संपत्ती या सर्व नैसर्गिक साधनसंपत्तीची व्यापारी ओरबड व विनाश थांबवून शेतकरी, आदिवासी, मच्छीमार आदी श्रमिकांचा त्यांच्या या निर्वाह साधनांवरील हक्क मान्य करुन या निसर्गसंपत्तीची जोपासना व अभिवृद्धी करण्यासाठी संघटनाची निकड आहे. निसर्गसंपत्तीचा पाया रुंदावून व समृद्ध करुन, शिक्षण, कसब वाढवून, शास्त्रतंत्रज्ञा-नाची समुचित जोड देऊन नैसर्गिक विविधतेच्या आधारावर वृत्ती व्यवसायात विवि-धता व निवडीला वाढता वाव निर्माण करणे गरजेचे आहे. त्याचबरोबर सामाजिक-आर्थिक-सांस्कृतिक देवाण-घेवाण व चलनवलन वाढवून चाकोरीबद्ध समाजरचना जोडण्यास चालना देणे शक्य होईल.

उत्पादनांच्या साधनांवरील खाजगी मालकीहक्क आणि भांडवलशहांचे नफे वाढवणे यासाठी उत्पादनवाढ ही भांडवली विकासनीती केंद्रीकरण व भांडवल प्राधान्य वाढवणारी, श्रमिकाला यंत्राचा गुलाम बनवणारी, पर्यावरणाचा विनाश करणारी, प्रदूषण प्रचंड प्रमाणात वाढवणारी, श्रीमंती व दारिद्र्य वाढवणारी, अन्याय्य, अमानवी, विनाशकारी अशी प्रचलित विकासनीती नाकारण्यासाठी सर्व श्रमिकांची एकजूट उभा-रण्याचे मोठे आव्हान आपणापुढे आहे. आज भ्रष्ट राज्यकर्त्यावर्गाने बहुराष्ट्रीय कंपन्यांशी हातमिळवणी करुन चालवलेली भारताची विक्री, त्यामुळे होणारे श्रमि-कांच्या जीवनसाधनांवरील निर्घृण हल्ले, वाढती बेकारी, महागाई, हालाखी, गुन्हेगारी, अराजकता, कर्जबाजारीपणा, दिवाळखोरीची वाटचाल रोखण्यासाठी अशी एकजूट

आवश्यक आहे. परंतु त्यामध्ये अनेकविध अडचणी आहेत. राज्यकर्तावर्ग, सहकारी सोसायट्या, शिक्षणसंस्था, नगरपालिका, जिल्हा परिषदा, येथील सत्ता व लागेबांधे आणि परवाने, कर्ज, नोकरी आदींची गाजरे यामार्फत विविध गटांचे सामिलीकरण करुन आहे. जाती, धर्म, प्रांतिकवाद यांच्या आधारे श्रमिकामध्ये फाटाफुट करुन दुफळी माजवून आहे. पोलिसी दंडुकेशाही, गुंडगिरी व दहशत वापरुन जनआंदोलने चिरडून काढत आहे. दैववाद, रुढीप रंपरा यांच्या जोखडात वांधलेली आणि जाती-धर्माच्या भितींनी विभागलेली जनता असहाय्य व परावलंबी आहे. सुशिक्षित वर्गाचे डोळे प्रामुख्याने अमेरिका, पैसा व चंगळवाद याकडे लागलेले आहेत. समाजाशी त्यांचे नाते नाही. नेतेमंडळी बहुसंख्येने सत्ता व संपत्ती जमवण्याच्या स्वार्थी राज-कारणात मशगूल आहेत. अशा भारताचे तारु बहुराष्ट्रीय कंपन्यांनी जागतिकीकर-णाच्या झंझावातात ओढले आहे आणि ते भरकटते आहे, फुटण्याची धास्ती वाटते आहे. अशा आणिबाणीच्या परिस्थितीत सामाजिक बांधिलकी मानणाऱ्या समाज-शास्त्रज्ञ, तंत्रज्ञान, व्यावसायिक, श्रमिक अशा सर्व स्वाभिमानी भारतीयांवर फार मोठी जबाबदारी आहे.

## समाजशास्त्रांचा विकास

आधुनिक समाजशास्त्रांचा उदय आणि विकास हा प्रामुख्याने भांडवलशाहीच्या उदयानंतर व प्रायः भांडवलशाही व्यवस्थेला समर्थन देशाच्या दृष्टीने, मदत कर-ण्याच्या दृष्टीने झाला. वास्तविक समाजविज्ञानाचा हेतू समाज–अर्थव्यवस्थेचे सखोल आकलन व चिकित्सा करणे हा होय. परंतु गेली शेकडो वर्षे समाजव्यवस्थेची पायाभूत असलेली वर्गव्यवस्था, उत्पादनाच्या साधनांवरील मालकीहक्क, त्याच्या संरक्षणार्थ कायदेकानून, स्त्रीदास्यत्व, श्रमिकांवर लादलेली गुलामगिरी, पुरुष वर्चस्वी कुटुंबव्यवस्था, आदींची टीकात्मक परखड चिकित्सा अर्थशास्त्र, मानवशास्त्र, समाजशास्त्र, कायदा आदी समाजविज्ञानांमध्ये अपवादानेच आढळते. मुख्य प्रवाह ही वर्गव्यवस्था गृहीत धरुन त्याचे समर्थन देण्यात किंबहुना त्याबाबतचे वास्तव लप-वून ठेवण्यात गुंतलेला दिसतो. भारतातील जातीधर्म व कर्मविपाक सिद्धांत, बाय-बलची शिकवण व पोप–चर्चची अधिसत्ता आदी मार्फत विषम, अन्याय्य समाजअर्थ-व्यवस्थेला समर्थन दिले गेले. अलिकडील काळात तर शास्त्राचे विकृतीकरण करुन वंशवाद पोसला गेला. गरिबीचे खापर लोकसंख्यावाढीवर फोडून आजची भीषण विषमता दडवण्याचा प्रयत्न चालू आहे.

## आधुनिक अर्थशास्त्र

१७७६ मध्ये ॲडम स्मिथचा 'वेल्थ ऑफ नेशन्स' हा भांडवलशाहीचे बायबल समजला जाणारा ग्रंथ प्रसिद्ध झाला, स्मिथने सरंजामशाही बंधने सोडून अनिर्बंध बाजारपेठेच्या ताब्यात औद्योगिक उत्पादन व वितरणव्यवस्था सुपूर्द केली पाहिजे

याचा हिरिरीने पुरस्कार केला. स्वहिताच्या (Self-interst) पाठीमागे धाव- णारा 'अर्थपरायण माणूस मुक्त बाजारपेठेच्या अमलाखाली जास्तीतजास्त लाभ मिळवू शकेल असे' 'स्वातंत्र्य' बाजारामार्फत होणारे अदृश्य नियमन प्रत्येक व्यक्तीला देते व त्यातच सर्वांचे अधिकतम हित आहे असा स्मिथ यांचा युक्तिवाद. श्रममूल्याचा सिद्धांत मांडून ऐतखाऊ राजे रजवाडे व बांडगुळी पोप-पाद्री या परपोशी वर्गावर टीकास्त्र सोडण्यात आले. सरंजामशाहीविरुद्ध लढताना मांडलेला हा सिद्धांत, भांड- वलदारवर्गाने आपले निर्णायक प्रभुत्व स्थापन केल्यावर, तो सत्ताधारीवर्ग बनल्यावर अडचणीचा होऊ लागला. श्रममूल्याचा सिद्धांत सांगत होता की, श्रम हेच संपत्तीचे रहस्य आहे आणि श्रमणाऱ्यांच्या चळवळी विचारत होत्या की कुठे आहे हीं आमच्या श्रमातून निर्माण झालेली संपत्ती ? श्रममूल्याच्या सिद्धांतातून भांडवलनफ्याचा स्त्रोत उघड होत होता. १८६७ मध्ये कार्ल मार्क्सने 'दास कापिटल' या ग्रंथात भांडवली अर्थव्यवस्थेचा उगम व गतिनियम भांडवल संचय, कामगाराची पिळवणूक, बेकारी, आर्थिक आरिष्टे याचे मूलगामी विश्लेषण करुन भांडवली व्यवस्थेचा काम- गार वर्गाच्या नेतृत्वाखाली अंत व समाजसत्तावादी समाजाकडील वाटचाल याची सैद्धांतिक मीमांसा केली. तर भांडवली अर्थशास्त्रज्ञांनी श्रममूल्याचा सिद्धांत निका- लात काढून मार्क्सचा सीमांत उपयुक्ततेचा सिद्धांत पुढे आणला. मूल्य कसे ठरते या प्रश्नाला बगल देऊन मागणी व पुरवठ्याच्या नियमाप्रमाणे किंमत निश्चितीचा गणिती सिद्धांत मानमान्यता पावला. मक्तेदारी नफे आणि वासाहातिक लूटमारीच्या जगतात खुलेपणा, (Laisser faire) आणि निखळ स्पर्धा या गृहित कृत्यावर अर्थशास्त्रीय सिद्धांतन चालू राहिले. अप्रस्तुत अमूर्तीकरण व गणिती विवरणपद्धतीं यांचे स्तोम माजवून सत्यशोधनाची पिछेहाट करण्यात आली. भांडवलशाहीतील क्रूर पिळवणुक, भीषण विषमता व अन्याय हे वास्तव गणिती समीकरणे व कल्पित प्रारुपे अशा विद्वत्‌जड त्यामुळे जनसामान्यांना गूढ व अनाकलनीय सिद्धांतनामागे दडवण्यात बहुसंख्य अर्थशास्त्रज्ञ गुंतले. वस्तुनिष्ठतेचा व शास्त्रीय पद्धतीचा आभास निर्माण करीत अर्थशास्त्रीय लिखाणात चक्रवाढीने वाढ होत गेली पण ती प्राय: अर्थहीन होती, त्यातून सैद्धांतिक प्रगती, ना समाजाच्या दृष्टीने प्रस्तुत आकलनवाढ.

हीच स्थिती समाजशास्त्र, राज्यशास्त्र, मानसशास्त्र आदी समाजशास्त्रांची आढळते. या शास्त्रांमध्येही समाजजीवनाच्या पृष्ठभागावर दिसणाऱ्या घडीमोडीं- पुरते वस्तुतथ्याचे (Facts) संकलन शेकडो कोष्टके आणि सांख्यिकी व गणिती प्रारुपे याची भर पडत आहे. परंतु वास्तवातील मूलगामी प्रक्रियांचे आकलन कर- ण्यात किंवा त्यातून उद्‌भवणाऱ्या भविष्यातील शक्यतांचे शास्त्रीय अंदाज करण्यात ती प्राय: असमर्थ आहे. एवढेच नव्हे तर अनेकदा वस्तुनिष्ठतेचे, शास्त्रीयतेचे, मुख- वटे चढवून मोठ्या प्रमाणात फसवेगिरीही चालते. परंतु समाजशास्त्रात ती सिद्ध

करणेही सोपे नसल्याने मिथ्याकथा टिकून राहातात. उदा. सिरिल वर्ट या शास्त्रज्ञाने बौद्धिक चाचण्याद्वारा सिद्ध केले होते की, बौद्धिक कसोटीत श्रमिक नीचतम पातळीवर तर अमीरउमराव उच्चपातळीचे गुणांक मिळवितात. अनेक दशकांनंतर उघडकीस आले की बर्ट यांनी सादर केलेली आकडेवारी म्हणजे निव्वळ बनवाबनवी होती. भारतामध्ये इतिहासाबाबत फार मोठ्या प्रमाणात विपर्यस्त व खोटी विधाने इतिहास म्हणून खपवली जातात. अनेक बाबतीत वस्तुस्थिती दडवून मोठे गैरसमज प्रसृत केले जातात असे आपणास आढळून येते. गरिबी आणि बेकारी बाबतची सरकारी आकडेवारी, मांडणी व व्याख्या यात बदल करुन वास्तव उघड होऊ नये अशा पद्धतीने सादर केलेली आढळते. प्रश्नपत्रिकांवर आधारित पाहाण्यांमध्ये प्रश्नपत्रिका मनानेच भरल्याची उदाहरणे घडतात. खेडेगावाच्या पत्रकांतील माहितीचे संकलन करुन जिल्हा, राज्य, राष्ट्र पातळीवर आकडेवारी एकत्रित केली जाते. पण गावची पत्रके वस्तुस्थिती दर्शक असतात असे नाही.

समाजशास्त्रांचा वापर विविध उद्योग, बँका, शासन आदीमध्ये व्यवस्थापनासाठी केला जातो. ऑपरेशनल रिसर्चच्या नावे उद्योगात कामगार 'स्वखुशीने' अधिक काम कसे देतील हा प्रयत्न, उद्योगांची बाजारपेठ विस्तारण्यासाठी 'मार्केट रिसर्च' फालतू, घातक (सिगारेट) वस्तू खपवण्यासाठी जाहिरातींद्वारा ग्राहकांवरील पकड घट्ट करण्यासाठी मानसशास्त्राचा वापर, टेलिफोनवर पूर्वग्रहदूषित प्रश्न विचारुन ठरीव वर्गाकडून मिळवलेल्या मतचाचणीचे निष्कर्ष छापून जनमतावर प्रभाव विशेषत: निवडणुकीच्या काळात विशिष्ट अंदाज शास्त्रीय अंदाज म्हणून छापून मतदानावर वजन टाकण्याचा प्रयत्न असा घातक, जनविरोधी पद्धतीनेही समाजशास्त्रांचा वापर मोठ्या प्रमाणात चालू आहे. संपत्तीधारी व सत्ताधारी यांचे वर्चस्व व प्रभाव टिकवण्यासाठी हजारो समाजशास्त्रज्ञ राबत आहेत. सहाजिकपणे समाजशास्त्राच्या अभ्यासक्रमामध्ये अशा नोकऱ्यांसाठी लागणारे अर्थशास्त्र, समाजशास्त्र, मानसशास्त्र समाविष्ट असतात.

## भारतातील समाजशास्त्रांचा अभ्यास

भारतातील समाजशास्त्रांचा अभ्यासक्रम भांडवलशाही देशातील विशेषत: इंग्लंडमधील अभ्याक्रमांनुसार घेतलेला आहे. भारतीय अर्थकारण, भारतीय समाज, भारतीय कायदा यांचा समावेश मुख्यत: उद्योग, शासन आदींतील नोकरीच्या गरजेनुसार आखलेला आहे. उदा. स्वयंसेवी संस्थामार्फत झोपडपट्टीत, खेडेगावी काम करण्यासाठी 'समाजसेवे'चा अभ्यासक्रम, उद्योगातील व्यवस्थापकीय पदे सांभाळण्यासाठी व्यवस्थापनाचा अभ्यासक्रम. अभ्यासक्रमातील सैद्धांतिक पातळीवरचे विवेचन प्रामुख्याने इंग्लंड-अमेरिका या इंग्रजी भाषिक अग्रेसर भांडवली देशांतून उचललेले असते. अजूनही सिमांतिक उपयोगिता सिद्धांत महाविद्यालयात शिकवला जातो.

प्रत्यक्ष आपल्या जीवनाच्या संदर्भात या सिद्धांताचा अर्थ विद्यार्थ्यांना उमगत नाही आणि प्राध्यापकांनाही माहिती नसतो. अवास्तव प्रारुपे, अप्रस्तुत सिद्धांतन आणि आकडेवारीचे ढिगारे यांमध्ये विद्यार्थ्यांना गुंतवून समाजापासून, वास्तवापासून अलग केले जाते. विद्यार्थ्यांच्या जीवनानुभवातून प्रगल्भ होत जाणाऱ्या जाणिवा आणि मिळणारे ज्ञान यातून पुढे येणाऱ्या उर्मी यास औपचारिक शिक्षण मारकही ठरते.

## समाजशास्त्रांपुढील आव्हाने

स्वातंत्र्य चळवळीच्या काळात प्राध्यापक, शिक्षक, वृत्तपत्रकार, साहित्यिक आदी विचारवंतांनी ज्ञानप्रसार, संशोधन आदी क्षेत्रात हेतुपुरःस्सर जबाबदारी उच-लली होती. परंतु स्वातंत्र्योत्तर काळामध्ये राजकीय पुढारी सत्ता-संपत्तीच्या पाठी-मागे तर उच्चशिक्षित मध्यमवर्ग पैसा आणि पाश्चिमात्य राहाणीचा आदर्श ठेवून भारतातही ते समाजापासून अलगपणे कुंपणबंद जगणें पसंत करत आहेत. कनिष्ठ मध्यम वर्गीय सद्याच्या जीवनकलहात पिचून जातो आहे. शहरातले यांत्रिक जीवन, राहात्या जागेचा जटील प्रश्न, रोजची प्रवासाची धकाधक, वाढती स्पर्धा, महागाई, अशाश्वतता यामुळे तो कुचंबून गेला आहे. पदवी हे केवळ नोकरीचे साधन बनले आहे. स्वतंत्र बाण्याने ज्ञानोपासनेची उमेद नाही आणि संधीही नाही. पण या वर्गाचे समाजाशी नाते तुटलेले नाही सांस्कृतिक मुळे उखडली गेलेली नाहीत. त्यामुळे एका बाजूला पराभूतपणापोटी धर्माचा दुराभिमान बाळगून समाज पुढे नेण्याऐवजी रामराज्य किंवा शिवशाहीचे पोकळ आदर्श ठेवून ते प्रगतीतील अडसरच बनत आहेत. दुसऱ्या बाजूला समाजाच्या प्रश्नांबद्दल, परिवर्तनाबद्दल आस्था असलेले तरुणतरुणी आहेत. परंतु आज संशोधन क्षेत्रात, सांस्कृतिक क्षेतांत ध्येयवादाला पोषक वातावरण नाही. अशा परिस्थितीत झगडून थोडे पुढे गेले तर पारितोषिकाची गाजरे व अन्य प्रलोभने त्यांचे प्रस्थापितांमध्ये सामिलीकरण करण्यासाठी लटकत असतात. देशातील गरिबीचे भांडवल करुन 'कारकर' करण्याच्या, परदेशीवाऱ्या, सरकारी कमिटयांवर नेमणुका, कन्सल्टन्सीतून, शिकवण्यातून मिळणारा पैसा अशा बाजारी वातावणामध्ये ध्येयवाद टिकवून आणि सामाजिक बांधिलकी मानून झगडणारे अल्पच.

अशा ध्येयप्रेरित समाजशास्त्रापुढे आज मोठी आव्हाने उभी वाहेत. समाज-शास्त्रज्ञानी प्रथमत: आज जे अभ्यासक्रम आहेत व क्रमिक पुस्तके आहेत त्याची चिकित्सक दृष्टीने छाननी करणे अगत्याचे आहे. त्यातील पाश्चिमात्यांचे अंधानु-करण, शासकीय धोरणांची तरफदारी, आकडेवारींच्या पसाऱ्यातून वस्तुस्थितीचा विपर्यास आदी मर्यादा विद्यार्थ्यांच्या लक्षात आणून देणे, फसवी माहिती, आकडे-वारी तपासून, पडताळून घ्यायला उत्तेजन देणे महत्त्वाचे आहे. त्यापुढे जाऊन आपल्या समाजअर्थव्यवस्थेकडे डोळसपणे पहाण्याची वृत्ती, तर्कशुद्ध विचारपद्धती,

चिकित्सक विश्लेषण, निर्भिड सत्यशोधन जोपासण्याचा प्रयत्न आवश्यक आहे. भारतातील परिस्थितीकडे उघड्या डोळ्यांनी पाहिले तर जातीयतेचा पगडा, धर्मांधता, दलितांना अमानुष वागणूक, स्त्रियांची अवहेलना व दडपणूक, जाहिरातबाजीतून होणारी ग्राहकाची फसवणूक, प्रसार माध्यमातून स्त्रीची भोगवस्तू म्हणून अपमानास्पद प्रतिमा, वाढती जुगारी, साहेबाजीवृत्ती, परकीयांच्या चंगळवाजीचे अंधानुकरण, पुढाऱ्यांची हांजी, अशा हजारो समस्या आपणापुढे उभ्या आहेत. परंतु पारंपारिक ब्राम्हणी वृत्तीतुन बरेच उच्चशिक्षित त्यापासून अलिप्त आहेत. समाजाकडून दक्षिणा घ्यावी, सीमांक उपयोगितेसारखे निरर्थक सिद्धांत शिकवले की संपले काम !

## मार्क्सचे योगदान

वास्तवतेची जाणीव प्रगल्भ करुन आणि बदलाच्या प्रक्रियेचे आकलन सखोल बनवण्याच्या दृष्टीने कार्ल मार्क्सनी मांडलेला समाजविकासाबाबतचा भौतिकवादी सिद्धांत मौलिक आहे. भौतिक परिस्थितीतून उत्पादनव्यवस्थेच्या पायावर त्या त्या काळातील धर्म, न्याय, कुटुंब, सामाजिक संस्था उभारलेल्या असतात. माणसे इतिहास घडवतात ती उत्पादनसंबंधात बदल घडवून. देश कालपरिस्थतीनुरुप या बदलाची प्रक्रिया समजून घेणे आणि जागतिक संदर्भात बदलांच्या शक्याशक्यतेचा विचार करणे अगत्याचे आहे. त्या दृष्टीने मार्क्सचा समाजधारणा, समाजपरिवर्तन यांच्याबाबतचा सिद्धांत आणि भांडवलशाही आर्थिक विकासाच्या गतिनियमांची चिकित्सा यांचा सखोल अभ्यास महत्त्वाचा आहे. त्या विचारपद्धतीला अनुसरुन भारतीय समाज व अर्थव्यवस्था यांचा अर्थ व बदलाची दिशा अभ्यासणे जरुर आहे. तरुण विद्यार्थी–विद्यार्थीनीना या सत्यशोध प्रक्रियेत सामील करुन घेण्याचे आव्हान समाजशास्त्रज्ञांपुढे आहे.

प्रश्न केवळ समाजाचा अर्थ लावण्याचा नाही तर खरा प्रश्न आहे समाज बदलण्याचा ! भारतीय समाज अजूनही निव्वळ नफा व पैसा केंद्री, भोगवादी भांडवल व्यवस्थेत गुंतला गेलेला नाही. विशेषत: नव्या आर्थिक धोरणाच्या जनजीवन उध्वस्त करणाऱ्या आक्रमणाविरोधात तो उभा राहात आहे. शेतकरी, मच्छीमार, आदिवासी, कामगार, कर्मचारी यांची आंदोलने उभी राहात आहेत. त्याचबरोबर सामाजिक–आर्थिक संबंध बदलासाठी आणि निसर्गाची ओरबड थांबवून निसर्गसंपत्तीची जोपासना व समृद्धी वाढविण्यासाठी तो झगडतो आहे, त्यामध्ये विज्ञान, तंत्रज्ञानाचे मोठे आहे. समाजशास्त्रज्ञ या प्रक्रियेत सहभागी होऊन आजची विद्यापीठे ही न्याय्य समानतापर व समृद्ध मानवी समाजनिर्मितीसाठी बदलाची केंद्रे

वनवून टाकतात. आपापल्या परिसरातल्या खेडेगावातील श्रमिकांशी सतत संवाद, तेथील परिस्थितीचा व समस्यांचा पद्धतशीर अभ्यास, व्यापक समाजअर्थ समस्यांचे सखोल विश्लेषण या मार्फत वदलाच्या प्रक्रियेत समाजशास्त्रज्ञांनी सामील होणे ही काळाची गरज आहे. जेव्हा विचार जनसमुदायाची पकड घेतात तेव्हा ते स्वतःच एक भौतिक शक्ती वनतात. साम्राज्यशाही आक्रमण थोपवण्याचा, ब्राम्हणशाहीचा विमोड करण्याचा, समाजवादी परिवर्तनाच्या ऐतिहासिक लढ्यात समाजशास्त्रज्ञ उतरले तरच त्यांचे वांडगुळी स्थान दूर होईल.

⁂⁂⁂



# इतिहासकाराची भूमिका

## प्रा. डॉ. सोमनाथ रोडे

इतिहास म्हणजे झाल्यागेल्या गोष्टीच्या केवळ शिळोप्याच्या गप्पागोष्टी नव्हेत, तर एखाद्या विषयाचा भूतकाळातून झालेला तो अखंड ओघ असतो. अलीकडील काळात इतिहासशास्त्राचे अनेक दृष्टीने महत्त्व वाढले आहे, खरं म्हणजे इतिहासातून भूतकाळातील विविध क्षेत्रातील घटना डोकावत असतात. त्या एका अर्थाने वर्तमान आणि भविष्यातील अनेक घटना-प्रसंगाचे सांधे जोडण्यास पथदर्शक म्हणून उपयुक्त ठरतात. भविष्यात घडणाऱ्या अनेक घटनांची नांदी इतिहासात सापडते. म्हणूनच त्या त्या काळातील इतिहास आणि ऐतिहासिक घटनांचे विश्लेषण इतिहासकारांनी अत्यंत तटस्थपणे व न्यायाधिशाच्या भूमिकेतून केले पाहिजे. तरच समाजाला बहुविध प्रश्नांकडे बघण्याची डोळस आणि वास्तववादी दृष्टी मिळण्यास मदत होईल. खरं म्हणजे समाजमन अनेक गुंतागुंतीच्या प्रश्नात हरपलेलं असतं. त्यास वास्तवतेच्या पायावर भक्कमरितीने उभे करण्याचे आणि तटस्थपणे घटनांचे-प्रसंगाचे संदर्भ समजावून देण्याचे कार्य इतिहासकाराला करावे लागते. सामाजिक परिवर्तनाच्या दृष्टीने इतिहासकाराचे हे एक महान कार्य आहे. कोंणत्याही स्वरुपाचे एकांगी, विकृत विश्लेषण करणारा इतिहास समाजात विकृत सदृश्य प्रवृत्ती निर्माण करण्यास कारणीभूत ठरतो. म्हणून इतिहासकाराचे समाजाच्या जडणघडणीत एक वैशिष्ठ्यपूर्ण स्थान असत. इतिहासकार हा खर तर त्या त्या काळाचा एक प्रतिनिधीच असतो.

इतिहास म्हणजे मानवी जीवनाचे व्यवहार उलगडून दाखविणारे शास्त्र होय.

इतिहास म्हणजे अनुभवांचा समृद्ध खजिना. इतिहास म्हणजे प्रेरणा. गेल्या हजारो वर्षातील एकामागून एक घडलेल्या लाखो घटनातून इतिहासकारांनी एक अर्थ शोध - ण्याचा प्रपंच केला आहे. इतिहास म्हणजे माणसांचा साराच खटाटोप. त्यांच्या आकांक्षा, धडपडी आणि त्यांचे यशापयश, इतिहास म्हणजे हजारो-लाखो अनुभव या सर्व घटना–प्रसगाचे, अनुभव विश्वाचे निरपेक्ष भूमिकेतून विश्लेषण करण्याचे अवघड कार्य इतिहासकाराला करावे लागते. इतिहासकाराच्या लेखणीतून शब्दबद्ध झालेला इतिहास समाजाचे मानस घडवण्यास कारणीभूत ठरत असतो. म्हणून त्या त्या काळातील ऐतिहासिक घटनांचे पृथ्थकरण करताना तारेवरची कसरत करावी लागते. स्वतः इतिहासकार देखील या व्यापक समाजसमूहाचा घटक असतो. त्याच्यावरती विविध घटनांचे पडसाद उमटलेले असतात. त्यातून त्याच्या स्वतःचे चिंतन, निष्ठा, स्वभावधर्म या सर्वांचे कळत–नकळत ऐतिहासिक विश्लेषणात प्रतिबिंब उमटणे स्वाभाविक असत. परंतु खऱ्या इतिहासकाराला न्यायाधिशापेक्षाही अधिक कठोर भूमिका घ्यावी लागते. तरच समाजाचे मन आणि मानस घडवण्यास तो साहचभूत ठरु शकतो. इतिहासकाराचा थोडासाही पक्षपातीपणा समाजजीवनावर जब्बर अघात निर्माण करु शकतो.

इतिहासकाराला एकीकडे माणसांचे विजय आणि पराभवही सांगावे लागतात. तर दुसरीकडे तो माणसातील महात्म्य दाखवतो आणि शूद्रताही उघडी करतो. इतिहासकारांच्या साह्याने इतिहासात लपलेला माणूस सगळया बाजूनी दिसतो. माणसाने अथवा मनुष्यसमूहाने स्वतःला ओळखण्यास पात्र ठरावे, त्याने सर्व प्रकारचे अभिनिवेश बाजूला ठेवून स्वतःचे व स्वतःभोवतीच्या प्रश्नांचे अस्सल मूल्यमापन करावे, ही कांहीशी कठीण जबाबदारी इतिहासकाराला पार पाडावी लागते. अर्थात इतिहासकाराने लिहिलेला इतिहास वाचला म्हणजे माणूस पुरता समजला असे नाही, परंतु समजण्यास मदत होते, ही वस्तुस्थिती नाकारता येत नाही. समाजाच्या आजच्या वर्तमानाचा अर्थ जाणण्यासाठी आणि भवितव्यातील वर्तनाचा अंदाज घेण्या– साठी इतिहासकाराला सम्यकपणे भूतकाळातील प्रसंगाची मांडणी करावी लागते.

इतिहासकार ज्या काळात इतिहासाची रचना करतो, त्या काळातील प्रचलित परिस्थिती, मूल्ये, आदर्श व हेतू आदींचा त्याच्या इतिहास लेखनावर परिणाम झाल्या– खेरीज राहत नाही. सुमारे दोन हजार वर्षापासून इतिहासाची रचना करण्याचे प्रयत्न होत असलेले आढळून येतात. प्रत्येक इतिहासकार उपलब्ध साधने, तथ्ये व पुरावे यांच्या साह्याने अर्थनिष्पती करण्याचा प्रयत्न करतो. निरनिराळया काळात नवीन कल्पना उदयास येतात आणि त्या कल्पना इतिहासकाराला इतिहासाचे पुन– र्लेखन करण्याची प्रेरणा देतात. चार्लस् डार्विनने उत्क्रांतिवादाचा सिद्धांत प्रतिपादन केल्यानंतर त्या दृष्टिकोनातून इतिहासाची परत रचना करण्याचे प्रयत्न सुरु झाले.

तर कार्ल मार्क्सने विकासवादाचा सिद्धांत मांडल्यानंतर आर्थिक समस्या व वर्गसंघर्ष या दृष्टीकोणातून इतिहासाची पुनर्रचना करण्याची प्रेरणा कांही इतिहासकाराला मिळाली.

मानवाने अतिप्राचीन काळापासून सभोवतालच्या परिस्थितीशी निकराने लढा दिलेला आहे. कांही प्रसंगी त्याने निसर्गापुढे नमते घेतले, बहुश: निसर्गाशी जुळवून घेण्याचा त्याने प्रयत्न केला. तर अनेक प्रसंगी त्याने निसर्गावर मात करण्यात यश संपादन केलेले आहे. सहस्त्रावधी वर्षाच्या प्रदीर्घ व खडतर संघर्षानंतर तो आजच्या अवस्थेपर्यंत पोहचला आहे. म्हणून इतिहासकाराने निरनिराळ्या काळातील मानवाचा सहानुभूतिपूर्वक विचार करणे जरुरी आहे.

हिरोडोटस् हा ग्रीस इतिहासकार इतिहासाचा मूळ जनक समजला जातो. इ. स. पू. पाचव्या शतकात त्याने या विषयाला स्वतंत्र स्थान प्राप्त करुन दिले. 'सत्याचा शोध' घेण्याचा त्याने अहर्निशपणे प्रयत्न केला. हिरोडोटस् हा चिकित्सक सत्यशोधक, गुणग्राहक रसिक, गद्यवाङ्मयातील कलावंत आणि आदर्श कथानिवेदक होता. तर त्याचा समकालीन थ्युसिडाईडस् हा वर्तमानकालीन घटनांचे वास्तव चित्र रेखाटणारा, वस्तुनिष्ठ व आदर्श तर्कशुद्ध इतिहास लेखन करणारा इतिहासकार होता. जर्मनी हा देश इतिहासाचे माहेरघर समजले जाते. लिओपोल्ड हॉन रँके यास इतिहासकाराचे तत्पूर्वीचे साहित्यिक स्वरुप अमान्य होते. त्याच्या मते इतिहासकाराने ऐतिहासिक घटना व तथ्ये याबद्दल स्वत: कोणताही निर्णय घेता कामा नये. भूतकालीन घटना, घडामोडी व तत्संबंधीची तथ्ये यांची यथार्थ स्वरुपात मांडणी करणे म्हणजे इतिहास होय, ही वास्तववादी कल्पना अस्तित्वात आली. इतिहासाला शास्त्रीय परिमाण देण्याचा हा पहिला प्रयत्न होता. इतिहासाकडे बघण्याच्या परंपरागत व सनातनी कल्पनेस प्रथमत: कार्ल मार्क्सने जबरदस्त धक्का दिला. इतिहासाला आर्थिक दृष्टिकोण प्राप्त करुन देणारा तो पहिला विचारवंत होता.

भारतीय प्राचीन इतिहास रामायण व महाभारत या महाकाव्याच्या स्वरुपात आढळतो. मध्ययुगीन कालखंडात सामाजिक जीवन धर्माने व्यापलेले होते. इतिहासाला त्या काळात गौण स्थान प्राप्त झाले. इतिहासकार देखील धार्मिक दृष्टिकोणातून इतिहास लेखन करीत. मध्ययुगीन भारताच्या केंद्रस्थानी सुलतान, राजे इ. सत्ताधारी व्यक्ती होत्या. मध्ययुगीन भारताच्या इतिहासलेखनामध्ये इतिहासकारांनी ज्या गोष्टींना निर्णायक महत्व दिले गेले आहे, त्या खरे तर अगदीच कमी महत्वाच्या आहेत. मध्ययुगीन इतिहासकारामध्ये समाजाच्या उत्पादन व्यवस्थेमध्ये होणारे बदल, त्या बदलांचा परिणाम म्हणून आकारणारी नवीन समाजरचना आणि या पद्धतीने विकास पावणाऱ्या समाजाच्या विविध टप्प्यावरच्या व्यवस्था यांचा अभ्यास करण्याचे भान ठेवल्याचे दिसत नाही.

भारतामध्ये १८५७ पर्यंत हिंदू–मुस्लीम जनतेच्या मनात हिंदू राष्ट्र अथवा मुस्लीम राष्ट्र ही विषारी कल्पना नव्हती.भारतामध्ये हिंदूराष्ट्र आणि मुस्लीमराष्ट्र ही विषारी कल्पना जेम्स मील ह्या ब्रिटीश तत्त्ववेता इतिहासकारानी रुजविली. तेथूनच जमातवादी इतिहास लेखनास अधिक चालना मिळाली. इ. स. १९२० ते १९४० मधील राष्ट्रवादी इतिहासकारांनी जमातवाद्यांच्या आव्हानाला सामोरे जाण्याचे अत्यंत प्रामाणिकपणे प्रयत्न केले. परंतु राष्ट्रवादी इतिहासकारांनी देखील निखळ तटस्थ राहून ऐतिहासिक घटनांचे समालोचन केले नाही, हे प्रकर्षाने जाणवते.

खरे तर इतिहासकाराने भूतकाळासंबंधीच्या रोमांचकारक कल्पनांच्या प्रेमात पडू नये की भूतकाळाला नाकारुन त्यातून मूक्त होण्याचा प्रयत्न करु नये. वर्तमान काळाचा खरा अर्थ समजून घेण्याची गुरुकिल्ली ह्या दृष्टीने भूतकाळाचे मर्म समजून घेण्याचा प्रयत्न केला पाहिजे. वर्तमानकाळातील सामाजिक प्रश्नांचा मूलभूत अर्थ समजण्याची कुवत जेव्हा इतिहासकारात येते तेव्हाच त्याला खरा इतिहास लिहिता येतो. इतिहासाचे खरे कार्य हे भूतकाळ व वर्तमानकाळ ह्यातील दुवा प्रस्थापित करणें, मर्मग्राही विवेचन करणे हे आहे.

कोणत्याही देशाच्या राजकीय, सामाजिक, आर्थिक व सांस्कृतिक परिवर्तन घडवून आणण्यात त्या त्या देशातील 'सामान्य माणूस'च केंद्रबिंदू असतो. त्यांच्या त्यागातून समर्पणातून मानवी इतिहासाची बांधणी होत असते. म्हणून इतिहास–काराने इतिहास घडविण्यातील सामान्य माणसाच्या योगदानाकडे कदापीही दुर्लक्ष करता कामा नये. तसे घडले तर तो ऐतिहासिक सत्यांचा अपलाप ठरण्याची शक्यतता आहे. त्या त्या देशातील ऐतिहासिक घटना घडविण्यात त्या त्या काळा-तील ध्येयवादी नेतृत्वाचा निश्चितच मोलाचा वाटा असतो. परंतु नेता, सेनापती, नृपती यांच्यामागे समर्पितवृत्तीने उभे राहिलेल्या असंख्य लोकांच्या रेटचामुळे (Movement of the Masses) इतिहासाचे क्रम बदलण्यात मदत होत असते म्हणूनच कोणत्याही काळात आणि जगाच्या पाठीवरील कोणत्याही देशात सामान्य माणूसच बदलत्या इतिहासचक्राचा "खरा नायक" असतो, ह्याचे भान इति–हासकाराच्या नजरेतून सुटता कामा नये.

इतिहास वाचावयाचा असतो तो मूळ माणूस अधिक चांगल्या तऱ्हेने समजावा एवढ्यासाठीच ! आजपर्यंत जे घडले, ते असे घडले, हे तसेच्या तसे समजून घ्यावे यासाठी ! इतिहासाच्या माध्यमातून मानवी जीवनाचे यथार्थ दर्शन घडावे, हीच तळमळ इतिहासकारामध्ये असली पाहिजे. इतिहासकाराने आपल्या मतलबासाठी इतिहासाला राबविण्याचा शूद्रपणा दाखवू नये. प्रसिद्ध विचारवंत सिसेरो म्हणतो की, 'जर माणसांनी त्याच्या जन्मापूर्वी काय घडले हे जाणून घेतले नाही तर तो लहान मूलच राहील.' ज्या समाजात माणस वाढतो तेव्हा त्याला स्वतःचा समाज व

भोवतालचे जग नीट समजून घेण्यासाठी इतिहासाचा डोळसपणे नि वस्तुनिष्ठपणे अभ्यास करण्याची नितात आवश्यकता वाटते. म्हणूनच इतिहासकारावर इतिहास निखळ व निर्मळ मनाने लिहिण्याची नैतिक जबाबदारी पडते.

कोणत्याही देशाच्या आणि समाजाच्या प्रगतीला सत्य हेच पोषक असते. म्हणून इतिहासकाराने सत्यशोधकाची भूमिका सोडता कामा नये. आज राजकीय, सामाजिक व आर्थिक क्षेत्रात जे अनेक घोटाळे निर्माण झाले आहेत, ते इतिहासाचे विपर्यस्त पद्धतीने मांडणी केल्यामुळेच घडून आले आहे. इंग्रजांनी सतत फुटीर वृत्तीना चालना देणारा इतिहास इथे घडविला. कदाचित् हाच इतिहास सतत शिकल्यामुळे देशात जागोजागी फुटीरतावादाची आणि मतलबीवृत्तीची भूते थैमान घालताना दिसत आहेत. म्हणूनच आजच्या परिस्थितीत इतिहासकाराने डोळयात तेल घालून ऐतिहासिक घटनांचे कठोरपणे विश्लेषण करणे आवश्यक ठरले आहे.

इतिहास घडला तसा लिहिला की, इतिहासकाराला लिहावा वाटला तसा लिहिला गेला, हे तपासण्याचे अवघड कामही एकीकडे समाजाने करण्याची क्षमता बाळगली पाहिजे. कपोलकल्पित गोष्टींना ऐतिहासिक सत्य म्हणून स्वीकारण्याचा धोका इतिहासकाराने टाळला पाहिजे. इतिहासाचे पुन:र्विलेखन करताना विवेकबुद्धी वापरली पाहिजे. ऐतिहासिक ग्रंथ, पाठ्यपुस्तके लिहिताना व्यक्तिगौरव, पुरुषार्थ व पराक्रम या मूल्यांचा अतिरेक होवू देवू नये. इतिहासकारांनी कोणत्याही टाकाऊ जुन्या कल्पनांचा अभिनिवेष बाळगून इतिहास लेखन करु नये. हिंदू राजे प्रजाहितदक्ष आणि मुस्लीम राजे छळवादी असे इतिहासाला अनिष्ठ वळण देणे उचित नव्हे. सर्व सामान्य जनतेनी संस्कृतीच्या व समाजाच्या विकासास हातभार कसा लावला यांचा उल्लेख इतिहासकारांनी आवर्जुन करावा.

निरोगी आणि निकोप समाजाची बांधणी ही इतिहासकाराच्या विशुद्ध व तटस्थ लेखन शैलीवर अवलंबून असते. इतिहासाच्या माध्यमातून समाजात उच्च ध्येये, मूल्ये व आदर्श रुजवली जावू शकतात. परंतु त्यासाठी सामाजिक भान ठेवून नि:पक्षपातीवृत्तीने इतिहासकाराने इतिहासलेखन करण्याची गरज आहे. सुप्रसिद्ध इतिहासकार ई. एच. कार म्हणतात की, "इतिहासकार वर्तमानकाळाचा प्रतिनिधी असतो, तर तथ्ये भूतकाळाचे प्रतिनिधीत्व करतात."

(पुर्नलेखन)

***

# मानवशास्त्रज्ञांची समाजातील भूमिका

डॉ. शौनक श्रीनिवास कुलकर्णी

मानवशास्त्रज्ञांच्या समाजातील भूमिकेचा विचार करतांना मानवशास्त्राची व्याप्ती समजावून घेणे अत्यंत महत्वाचे आहे. मानवशास्त्र म्हणजे मानवाचा सर्वांगिण अभ्यास. या मोजक्या शब्दात सर्व गर्भित अर्थ दडला आहे. हे शास्त्र मानवाचा अभ्यास करणारे आहे. त्याच्याशी संबंधित अशा सर्व घटकांचा अभ्यास त्यात होतो. मानव हा जसा एक सजीव प्राणी (जीवशास्त्रीय घटक) आहे तसाच तो एक समाजातील प्राणीही आहे. त्यामुळे अगदी मानवाच्या उत्पत्तीपासून आजच्या प्रगत अवस्थेपर्यंत मानवाच्या सर्व अवस्थांचा आणि मानवी समाजाच्या स्थित्यंतराचा सर्व आलेख मानवशास्त्रात येतो. या सर्व घटकांचा अभ्यास करणारा तो मानवशास्त्रज्ञ.

मानवशास्त्राच्या व्यापक स्वरुपामुळे मानवशास्त्रज्ञांच्या भूमिका सुद्धा विविध आहेत. समाजशास्त्राशी असलेल्या घनिष्ट संबंधामुळे मानवशास्त्रज्ञांची ओळख समाजशास्त्रज्ञ म्हणून ही होते. वास्तविक समाजशास्त्रज्ञ समाजातील मानव, त्याची संस्कृती, प्राचीन कालापासून मानवी शरीरात आणि मानवी समाजात झालेले बदल, माणसाचे कर्तृत्व, प्रगती, औद्योगिकरण, आरोग्य आणि पर्यावरण या सर्व घटकांचा अभ्यास करत असतो. मानवशास्त्रज्ञांच्या मते संस्कृती हा माणसाच्या सर्व प्रगतीसाठी महत्वाचा घटक असतो. प्रत्येक समाजाची एक संस्कृती असते.

मानवशास्त्राच्या व्यापक स्वरुपामुळे इतिहास, पुरातत्व, समाजशास्त्र, तत्त्वज्ञान आणि जैविक शास्त्राचा आपापल्यापरीने मानवशास्त्रज्ञात सहभाग होत असतो. या ..... . . ...

सर्व विषयांचे ज्ञान आणि अभ्यासपद्धतीचा अंतर्भाव मानवशास्त्रज्ञ आपल्या अभ्यासात करत असतात. माणसाची उत्पती कशी झाली किंवा त्याच्या आणि इतर प्राणीमात्रांच्या मधील साम्य आणि फरकाचे मुद्दे कोणते हे जैविकशास्त्राच्या आधारे कळू शकते. त्याचा आहार व पोषण कसे असावे त्याच्या आरोग्यावर परिणाम करणारे घटक कोणते याचाही विचार मानवशास्त्रज्ञ करतात. मानवाच्या किंवा स्वतःच्या अस्तित्वाचे कारण कोणते, किंवा धर्म आणि श्रद्धा, यांचा विचार तत्त्वज्ञानाच्या सहाय्याने करता येईल. पण त्यामागे विविध माणसांच्या किंवा मानवी समाजाच्या कल्पना वेगळ्या असतील. त्यांची मते पद्धती आणि स्वरुप वेगळे असेल त्याचा एकत्रित विचार मानवशास्त्रज्ञच करतो. याशिवाय मानवाची शरिरीक जडणघडण, रुढी, परंपरा आणि सर्व सांस्कृतिक वैशिष्ठ्यांचा अभ्यास मानवशास्त्रज्ञ करतो. मानवशास्त्रात प्रत्येक मानवशास्त्रात प्रत्येक मानवी वर्तनाला महत्व असते त्याचा उपयोग करुन मानवशास्त्र निष्कर्ष काढत असतात.

मानवशास्त्रज्ञांनी पुरातत्वशास्त्रज्ञांच्या मदतीने उत्खननात भाग घेऊन प्राचीन मानवाचे अवशेष मिळविले. उत्खननात मिळालेले अवशेष मानवीच आहेत का ? तसेच ते कोणत्या शरीरवयाचे आहेत. व्यक्तिचे लिंग कोणते असावे. मृत्यू समयीचे वय तसेच मृत्यूचे कारण कोणते असावे. या सारखी माहिती मिळविण्यासाठी पुरातत्वज्ञांना मानवशास्त्रज्ञांचीच मदत घ्यावी लागते. इतकेच नाहीं तर उत्खननात मिळणारी दगडी हत्यारे, खापरे, मणी किंवा तत्सम असंख्य गोष्टीवरुन तत्कालिन मानवाच्या संस्कृतीचा विचार करण्याचे कामही मानवशास्त्रज्ञाच्या अखत्यारीतच येते. आदिवासी समाज, ग्रामीण समाज शहरी औद्योगिक समाज यांचे प्रश्न समस्या वेगवेगळ्या असतात. त्याची कारणेही वेगवेगळी असतात. त्यामागे काही सांस्कृतिक घटकही असतात. अर्थातच अशा समस्यांची उकलही वेगवेगळ्या मानवशास्त्रीय पद्धतीने करावी लागते. मानवशास्त्रज्ञ समाजात किंवा समाजाच्या सर्व थरात मिसळून प्रत्येक समस्येची उकल करण्याचा प्रयत्न करतात. मानवशास्त्रज्ञांचा अभ्यास कोणा एका विशिष्ट मानवी गटावर, विशिष्ठ ऐतिहासिक काळातील मानवावर नसतो. आदिकालापासून आजपर्यंत मानवाने केलेल्या सुधारणा, सांस्कृतिक बदल त्यांचे स्वरुप याची नोंद मानवशास्त्रज्ञ घेत असतात.

मानवशास्त्रज्ञांच्या संशोधनाची जागा किंवा प्रयोगशाळा म्हणजे समाजाचे क्षेत्र किंवा फिड (Field) समाजाची किंवा लोकांची माहिती हवी असल्यास ती साधे सरळ प्रश्न विचारुन मिळेलच असे नाही. ती समाजात मिसळून संबंध निर्माण करुन आणि समाजाबाहेर तटस्थपणे राहून, निरिक्षण करुन काढावी लागते. कितीतरी गोष्टी अशा असतात की, त्या खाजगी किंवा व्यक्तिगत स्वरुपाच्या असतात. आर्थिक, धार्मिक गोष्टीवर प्रत्यक्ष माहिती मिळेलच असे नसते. यापेक्षाही व्यक्तिग आरोग्याची

काही तक्रार असेल, अनुवांशिक आजार असेल किंवा वैवाहिक संबंध, लैंगिक समस्या. कुटुंबनियोजन यासारख्या विषयावर अगदी सुशिक्षित समाजाकडूनही माहिती मिळ-विणे अवघड असते. या ठिकाणी व्यक्तिगत मते आणि सामाजिक परंपराही वेग-वेगळ्या असू शकतात. यासारख्या अत्यंत गुंतागुंतीच्या विषयावर किंवा समस्यावर माहिती घेऊन त्याची उकल करणे हे मानवशास्त्रज्ञांचे कौशल्य असते. विविध सह-कारी योजना तयार करणे, त्या राबविणे आणि त्याचे यश हे सर्वस्वी मानवशास्त्रीय संशोधनावर अवलंबून असते.

काही आदिवासी जमातीत गाईचे दूध पिणे किंवा लहान मुलांनाही देणे अयोग्य मानतात. वास्तविक घरात असलेल्या दूधाचा वापर वाढत्या वयाच्या मुलां-साठी करुन त्यांची पोषणाची गरज भागविता येईल. परंतु हे दूध फक्त गाईच्या वासरांसाठीच आहे असे मानून आपले नुकसान करणे योग्य नाही अशा प्रकारच्या कितीतरी गैरसमजुती, मते असतात ती लोकांत मिसळल्याशिवाय कळत नाहीत आणि त्यानंतर शिक्षणाने लोकांचे मतपरिवर्तन करणे हे मानवशास्त्रज्ञांचे काम आहे. दुसरे उदाहरण म्हणजे दारुबंदी, दारुबंदी कितीही सक्तीची केली तरीही आदिवासी भागात त्याला यश येत नाही तसेच चोरट्या मार्गाने दारु गाळपही केले जाते. शहरी भागात दारुबंदीला अपयश येण्याची कारणे ही आदिवासी भागातील अपयशापेक्षा वेगळी आहेत. दारु हा आदिवासींच्या जीवनातील अविभाज्य घटक आहे, आदि-वासी पुरुषच नव्हे तर स्त्रिया आणि मुलेही दारु घेतात. कमी पोषणमूल्याचा आहार, दिवसभराच्या श्रमानंतर क्षीण घालविण्यासाठी दारुचा वापर फार मोठ्या प्रमाणावर होतो लग्नादीकार्यक्रमात, सणसमारंभाला दारुला सामाजिक स्थान असते. इतकेच काय भिल्लांमध्ये गर्भवती स्त्रीस प्रसुतीच्या वेदना कमी करण्यासाठी दारु पाजणे अगदी सहजपणे घडते. आहार, औषध आणि समारंभात लग्नकार्यातही स्थान मिळविलेली दारु ही कायदेशीर बंदी घालून बंद होणार नाही. तर तिच्या सेवना-मागे असलेली भूमिका, गरज समाजातून घ्यावी लागले आणि त्यावर बंधने घालायची असली तर ती मत परिवर्तनाने घालावी लागतील. अगदी हेच काम मानवशास्त्रज्ञ करु शकतात.

साक्षरता अभियान, शाळेतील मुलांची हजेरी वाढविणे, यासारखे कार्यक्रम शासनाकडून राबविले जातात. ते धोरणात्मक किंवा ध्येयात्मक असले तरीही त्याच्या उद्दिष्टपूर्तीमध्ये मानवशास्त्रज्ञांचा सहभाग महत्वाचा असतो. त्यासाठी मानवशास्त्रीय सर्वेक्षण महत्वाचे ठरते. केवळ आर्थिक सहाय्य करुन विद्यार्थी शिकणार नाहीत. आदिवासी किंवा ग्रामीण भागातील परिस्थिती वेगळी असते तेथील शाळांमधून होणारी विद्यार्थ्यांची गळतीची कारण वेगळी असतात. उदा. मुले शाळेत गेली तर गुरे वळायला कोण जाणार अथवा शेतावर काम कोण करणार ? इथपासू ते आईबाप

कामावर गेल्यावर लहान भावंडाकडे कोण पहाणार ? अशी असंख्य कारणे असतात. यामुळे शाळेतील विद्यार्थ्यांची विशेषतः मुलींची गळती जास्त असते. शाळेची फी माफ करणे, वह्या पुस्तके मोफत देणे, शाळेत सुकडी दूध देणे यासारख्या गोष्टी मुलांना आर्थिक आहाराविषयक मदत करतील किंवा त्यांना आकृष्ट करुन घेतील पण त्या मागची कारणे समजून उपाययोजना करण्यासाठी मानवशास्त्रज्ञांचा वाटा असतो.

धरणाखाली जाणाऱ्या जमीन मालकांचा किंवा पर्यावरण समर्थकांचा वनसंपदा पाण्यात नष्ट होईल या भितीने धरण किंवा तत्सम प्रकल्पांना विरोध असतो. यावर आधुनिक औद्योगिक विचारसरणीच्या लोकांची दृष्टी फक्त आर्थिक किंवा दृष्य लाभावर असते. या दोन्हीची संघर्षाशिवाय सांगड घालणे गरजेचे असते. एखाद्या ठिकाणी रहात असलेल्या नागरिकांच्या काही श्रद्धेच्या जागा असतात काही ठिकाणे असतात. कित्येक पिढ्यांची गुजराण तेथे झालेली असते. त्याला वंचित होण्याची दुःख फार मोठे असते. शिवाय कित्येक दुर्मिळ वनस्पती, प्राणी, औषधी, किंमती वनस्पती नाहीशा होणार असतात. अशा भावनेतून तो विरोध करतो. त्यांचे पुनर्वसन होते, जमिनी मिळतात, काहीचा लाभ होतो काही पार संपून जातात पण संघर्षाच्या, बदलाच्या काळात मानवशास्त्रज्ञ आपली भूमिका बजावू शकतात. कित्येक अनुत्तरित प्रश्नांना फुंकर घालण्याचे काम मानवशास्त्रज्ञ करतांना अशा गोष्टींसाठी मानवशास्त्रज्ञ आपल्या विशिष्ठ अभ्यासपद्धतीचा अवलंब करत असतात, उदा. Participant & Nonparticipants observation, Formal & in-formal interview, in formants interview etc. ज्या प्रमाणे सामाजिक संदर्भात मानवशास्त्रज्ञ आपले योगदान देतात. त्याप्रमाणेच आरोग्य-विषयक किंवा जैविक समस्यांवरही मानवशास्त्रज्ञ भाष्य करु शकतात. काही वर्षा-पूर्वी युरोपात काही स्त्रियांच्या प्रसूतीच्यावेळी त्यांनी अशी आपत्ये जन्माला दिली की त्यांच्या हाताची वाढ पूर्ण झालेली नव्हती. यासाठी जेंव्हा सर्वेक्षण केले गेले. संशो-धन केले तेव्हा लक्षात आले की, प्रसूती वेदना कमी व्हाव्यात व शांत झोप लागावी यासाठी काही औषधाचा वापर केला होता. हा प्रश्न वैद्यकशास्त्राच्या अखत्यारी-तील असला तरी त्रास टाळण्यासाठी औषध घेण्याची प्रवृत्ती ही मानवी आहे आणि त्यांनी हे औषध घेतले त्याचा परिणाम हाताच्या वाढीवर झाला. औषध आहारविषयक सर्वेक्षणातून लक्षात आले की, हाताच्या वाढीसाठी आवश्यक असणाऱ्या रंगसूत्र (जीनस) वर परिणाम झाल्याने हातांची वाढ योग्य झाली नाही हे कोडे मानवी अनुवंश शास्त्रामुळेच उलगडू शकले. मानवी अनुवंश-शास्त्र ही मानवशास्त्राचीच एक शाखा आहे.

पुरामानवशास्त्रज्ञही प्राचीन मानव आणि समाज अथवा त्यांच्या समस्यांची उकल करु शकतो. उदा. हडप्पा येथील मानवी सांगडे, अवशेष मिळाले यामध्ये जे दात

मिळाले त्यामध्ये किडलेल्या दातांचे प्रमाण अधिक आहे. याला कारण तेथील लोकांचा कर्बादक (कर्ब्रौहायड्रेट) युक्त आहार. त्यांचा आहार दाखवणारे इतरही पुरावे आहेतच. तत्कालीन समाजाचा आहार आणि आरोग्य विषयी माहिती मानव-शास्त्रज्ञ देऊ शकतात. ताम्रपाषाणयुगीन पूर्वजांमध्ये मडक्यातील दफनाचे प्रकार आस्तित्वात होते किंवा मध्याश्मयुगात मानवी सांगडे गोलाकार शिळासध्ये पुरले जात. शिवाय त्यांच्याबरोबर मिळणारे इतर प्राण्यांचे (विशेषतः घोडा) मातीची भांडी असे अवशेष तत्कालीन मानवाची संस्कृती किंवा मृत्यूनंतरचे जीवनाचां दृष्टीकोण, सांपत्तिक स्थिती दर्शवितात आणि हे अवशेष शोधणे त्यावरुन त्यांचे आरोग्य, आयुर्मान, संस्कृती या बद्दल निष्कर्ष काढणे ( Interpretation ) हे पुरामानवशास्त्रज्ञ करु शकतात.

थोडक्यात मानवशास्त्रज्ञांचे समाजातील स्थान हे मोठे आहे. प्राचीन आणि अर्वाचीन मानव, त्यांचे मन, त्यांच्या कल्पना, त्यांची जीवशास्त्रीय जडणघडण किंवा सामाजिक स्वरुप या बद्दल मानवशास्त्रज्ञच सर्वंकंष विचार करु शकतो. अर्थात या-साठी त्याला सर्व शास्त्रांचा, सर्व कलांचा, सर्व विषयांचा वापर करावा लागतो. शेवटी मानवापासून सुरु होऊन मानवाशीच संपणारे ते शास्त्र मानवाचा सांगोपांग विचार करणारच आणि मानवी समाजात संस्कृती हाच मानवाचा आधार आहे.

***



# विचारवंतांकडून कार्यकर्त्यांच्या अपेक्षा

श्रीनिवास कुलकर्णी

'छात्र युवा संघर्ष वाहिणीत' असताना संघर्ष वाहिणीची, भूमिका म्हणून 'व्यक्ती वा ग्रंथ विशेषाच्या आग्रहाचा त्याग' ही भूमिका स्वीकारली असल्यामुळे व तीच भूमिका पुढे 'रचनात्मक संघर्ष समिती' ने स्वीकारली असल्यामुळे प्रत्येक बाबतीत स्वतंत्रपणे विचार करावयाची सवय लागली, परिणामी कुठल्याही विषयात पारंगत न बनता त्या त्या विषयाची तोंडओळख करुन घ्यावयाची सवय झाली. अंगी बहुश्रूतता आल्यामुळे 'तज्ञ' पणा ऐवजी 'सुज्ञ' पणा आला. 'तज्ञ' या 'विचारवंत' व्यक्तीबद्दल आदर असून 'आकर्षण' वाटत नाही. परिवर्तनाच्या चळवळीत विचारवंत आणि कार्यकर्ता या नात्याने जेव्हा जेव्हा दरी वा अंतर निर्माण होते तेव्हा त्याचा फायदा प्रस्थापित भांडवलदार घेतात. प्रतिगामी शक्ती उचल खाते. याचा अनुभव सर्रास येतो व म्हणून विचारवंत व कार्यकर्ते यांच्यातील संबंध परस्परपुरकच असले पाहिजेत. कॉ. लेनिन यानी म्हणल्याप्रमाणे कृतिविना ज्ञान हे शून्य आहे. तर ज्ञानाविना कृति ही आंधळी आहे. भारतासारख्या सामाजिक विषमता, अज्ञान, अंधश्रद्धा ग्रंथ प्रामाण्य, ईश्वराचे महात्म्य, धर्मांधता, पुरोहितवर्ग वर्चस्व, अवतारवाद, भाग्यवाद ठासून भरलेल्या व तो हजारों वर्षापासून यथावत चालू राहण्याची निरंतर व्यवस्था करण्यात आलेल्या, देशात अशा प्रकारची "विचारधारा" तत्त्वज्ञान म्हणून मान्यता पावत असताना, 'परिवर्तन'कारी चळवळीत "विचारवंतांची" भूमिका अधिकच स्पष्ट, दीर्घजीवी, सकस व आत्मविश्वासपूर्वक असायला हवी. कुठल्याही संकटाला, प्रलोभणाला बळी न पडता आपली भूमिका निःसंकोचपणे व आत्मविश्वासपूर्वक

मांडावयास हवी. म. ज्योतिराव फुले, गो. ग. आगरकर, डॉ. बाबासाहेब आंबेडकर, महर्षि वि. रा. शिंदे यांनी म्हटल्याप्रमाणे भारतातील परिवर्तनाचा लढा हा 'मूल्य-परिवर्तनाचा लढा' आहे. प्रबोधनाची लढाई प्रत्येक टप्प्यावर लढावी लागणार आहे. 'बुद्धीभेद' करणाऱ्या या व्यवस्थेत "विद्याबंदी" होती. वेदाध्ययनाचा, वा ज्ञानसंपादनाचा अधिकार मूठभरांना होता. त्रैवर्णिकाची 'सेवा' करण्याची 'सक्ती' हेच 'भक्ती' म्हणून सूत्र वापरले जात होते. कर्मविकाच्या सिद्धांतावर जातीव्यवस्था बळकट होत होती. अशा व्यवस्थेत मुल्यपरिवर्तन अपरिहार्य होते आहे. मुल्य-परिवर्तनासाठी प्रबोधनाची चळवळ गतिमान करण्यासाठी 'विचारवंतांची' भूमिका अपरिहार्य आहे.

व्यवस्थापरिवर्तनाच्या लढाईत 'विचारवंतांनी' सर्वप्रथम नवीन मूल्याची 'पेरणी' करावयास हवी. जुन्या विषम, असमान व अत्याचारप्रधान मूल्याच्या जागी समता, स्वातंत्र्य, बंधुता, न्याय ही मूल्य प्रवर्धित करणारी, जुन्या विषम मूल्यांना छेद देणारी व त्याचे जनमानसातील 'वर्चस्व,' 'प्रतिष्ठा' खाली खेचणारी चळवळ उभारावयास हवी. आज 'मनुस्मृतीवर' आधारीत संविधान बनवण्याची वा सतिप्रथेचे समर्थन करण्याची विचारधारा वळावत आहेत. 'विचारापेक्षा' 'पैसा' प्रधान बनत आहे. ज्ञानसंग्रहाऐवजी 'नफा' प्रधान प्रवृत्ती एक मूल्य म्हणून बळावत आहे. अशा अव-स्थेत बदलत्या समाजव्यवस्थेतील बदलणारे संबंध लक्षात घेऊन, नवीन आशयात व संदर्भात ती मांडावी लागणार आहे जो पर्यंत नवीन मूल्याची पेरणी व जुन्या मूल्याला विरोध ही भूमिका विचारवंतांकडून होत नाही तो पर्यंत कार्यकर्त्यात 'द्विधा' अवस्था मनात निर्माण होते

व्यवस्था परिवर्तनाची लढाई लढतेवेळेस अपरिहार्यपणे समाजातील दलित, शोषित, पिडित जाती/वर्ग समूहांना स्त्रीपुरुषाना त्याच्या प्रश्नाची जाणीव करुन देवून त्याच्यावरील अन्याय अत्याचाराचे मूळ शोधून काढून त्याना समजावून सांगणे व त्याचे 'सोबत' राहाणे ही प्रक्रिया करण्याची फार गरज आहे. प्रस्थापित समाज-व्यवस्था व तिचे हितसंबंधी घटक हे 'वंचिताचे', 'उपेक्षिताचे' प्रश्न हे प्रश्न म्हणून मान्यता द्यावयास तयार होत नाहीत. जो पर्यंत हे प्रश्न ऐरणिवर येत नाहीत तो पर्यंत हे प्रश्न निकाली निघण्याच्या दृष्टीने संबंधित घटक जागृत होऊन संघटीतपणे व लढण्यास वा हक्क मागण्यास तयार होणार नाहीत. या पार्श्वभूमीवर भारतीय विचारवंतांची भूमिका या विविधप्रश्नासंदर्भात 'गोलमाल', 'घसरणारी', किंवा पक्ष-पाती वाटते. 'नविन आर्थिक धोरण', 'मंडल आयोग', 'परित्याक्ताचे प्रश्न', 'किमान वेतन', 'व्यसनमुक्ती' भटके, विमुक्त, आदिवासी व दलितावरील 'अत्याचार' 'अंध-श्रद्धा' निर्मुलन या बाबतीत 'विचारवंत' जी भूमिका घेतात त्यावरुन कार्यकर्तें व विचारवंत यात तनाव निर्माण होतो व प्रश्न निकाली निघण्याऐवजी गोंधळ निर्माण

होतो व एकदा गोंधळ निर्माण झाला की, त्याचा फायदा प्रस्थापित व प्रतिगामी लोकाना/शक्तीना होतो. म्हणून कुठल्याही प्रश्नासंदर्भात विचारवंतांनी आपली भूमिका स्पष्ट करताना, 'सारस्वतकारानी' आपली लेखणी झिजवताना उपेक्षिताचे प्रश्न कसे निकालो लागतील वा बंधमुक्तीचे तत्त्वज्ञान कसे रुजेल असा प्रयत्न करावा. 'सा विद्या सा विमुक्तये' हे तत्त्व प्रत्यक्षात आचरणात कसे येईल ते पहावे.

आज 'समाजमन' हे परिवर्तनकारी चळवळीस अनुकूल नाही. घरातील कौटुंबीक वातावरणापासून ते सर्व स्तरावर एका विरोधाभासाच्या स्थितीत रहावे लागते. सर्व स्तरावर 'उपेक्षा' व 'वंचना' सहन करावी लागते. आर्थिक ओढाताण मानसिक वंचना व अवेहलना यात जीवन जगावे लागते. या बाबीमुळे कार्यकर्ता खचून जातो. आज अशा अवस्थेत 'कार्यकर्त्यांना' प्रोत्साहित करण्याची गरज आहे. केलेल्या कामाची पोच देणे, त्याला 'शाबासकी' देणे, ह्यासंदर्भात प्रोत्साहनपर वा सहानुभूती-पूर्ण वातावरण बनेल अशी चर्चा घडवणे. कार्यकर्त्यांच्या अडचणीबाबत वैयक्तिक पातळीवर विश्वास निर्माण करुन त्याला दिलासा देणे. कार्यकर्त्याच्या ज्या चूका होतात त्या चूका त्याला विश्वासात घेऊन दाखवून देणे व त्या सुधारण्यासाठी सह-भागी सहयोग करणें. आदी बाबी 'विचारवंतांकडून' अपेक्षित आहेत. कार्यकर्ते 'नाराज', निराश होतात याची स्थूल मानाने दोन कारणे आहेत. एक कार्यकर्त्यांना आगामी काळात होवू घातलेल्या घडामोडीचा अंदाज घेता येत नाही. व दुसरे म्हणजे चळवळीसाठी 'निधी' म्हणजे 'साधना' चा स्त्रोत नक्की कुठून येईल याचा अंदाज राहात नाही. परिणामी कार्यकर्ते एका विशीष्ठ मर्यादेनंतर टाकून जातात. निराश होतात. एका दृष्टे विचारवंत या नात्याने हे दृष्टेपण कार्यकर्त्यात यावे यासाठी प्रयत्न करणे गरजेचे आहे. 'साक्षरता'ची जुळवाजुळव केवळ आर्थिक नव्हे तर सर्वच बाबतीत करण्याची गरज आहे.

'विचारवंत' हा समाजातील एक प्रभावशाली व परिणामकारी घटक आहे. त्याच्या विचाराचा जेवढा प्रभाव असतो त्याहीपेक्षा त्याच्या 'कृति'चा परिणाम जास्त पडतो. म्हणून विचारवंतांनी आपल्या 'विचार व कृतित' सम्यक व विवेकी अंतर ठेवणे गरजेचे आहे. संघटनात्मक पातळीवरच नव्हे तर वैचारिक पातळीवर पण 'समतेचा' सम्यक दृष्टीकोन असणे गरजेचे आहे. बरेच विचारवंत वैज्ञानिक, लोक-शाहीवादी, समतावादी, समाजवादी, शोषणमुक्तीचा स्त्री नर-नारी समतेचा विचार मांडतात पण प्रत्यक्षात वैयक्तिक पातळीवरील त्याचे वर्तन बहूतांश विरोधी असते. हुंडा घेणे, पत्नीस मारहान करणें, दारु पिणे, चार-पाच मुलबाळ असणे, जातीयवादी

॥ १३ ॥

# कलावंत आणि समाज

वसंत मा. जाधव

कलावंत हा प्रज्ञांवंत सर्जनशील व्यक्तीमत्त्वाचा असतो. आपली प्रज्ञा तो कलानिर्मितीसाठी वापरतो. तो कलागुणसंपन्न असतो. याचा उपयोग तो कलासर्जनासाठी करतो. कलेतून तो आपली "अपूर्व वस्तू निर्माणक्षम प्रज्ञा" वापरतो आणि कलापूर्ण अनुभव दुसऱ्यापर्यंत, समाजापर्यंत संक्रांत व्हावा यासाठी आयुष्यभर कष्ट करतो. आपल्या विवेकाला, सामाजिक विचाराला समाजाच्या संघटनेसाठी, उत्थानासाठी वापरतो. कलावंत हा चिंतक विचारवंतही असतो. आपल्या व्यक्तिमत्त्वातील चिंतनशील विचारवंताला तो आपल्या प्रतिभाबलाच्या कलागुणासह व्यक्त करत असतो. कलावंताला जेवढा व्यामिश्र अनुभव व्यक्त करावयाचा असेल, समाजाविषयी जेवढे अधिक त्याला सांगावयाचे असेल तेवढी त्याची कला अधिक संपन्न होत जाते. तो आपल्यातील विचारवंत आणि कलावंत यांचेच संक्रमण दुसऱ्यापर्यंत करत असतो. त्याच्याजवळ समाजाच्या उत्थानासाठी सांगण्यासारखे कांही नसेल तर तो कलागुणांनी युक्त सांगणार तरी काय ? त्याच्याकडे समाजजीवनाविषयी काहीएक चिंतन, कांही एक धारणा, एक दृष्टी आणि वैशिष्टयपूर्ण भूमिका असते. या शिवाय जोकलावंत लिहितो तो समाजाला कांही देऊ शकत नाही.

कलावंत युगपरिवर्तनासाठी कांही पायाभूत तत्त्व घेऊन पुरोगामी विचार घेऊन तो उभा असतो. उर्ध्वगामी दृष्टी घेऊन आजच आधुनिक शहाणपण घेऊन तो समाजाला सामोर जातो. असे असेल तरच समाजाला आपल्या प्रतिभाबलाने तो क्रियाशीलतेसाठी शक्ती पुरवू शकेल. सर्वच मोठ्या आणि श्रेष्ठ कलावंतांनी हे

कार्य आपापल्या काळात केलेले आहे. म्हणूनच काही कलावंतांची नावे मानवी संस्कृतीच्या इतिहासात अजरामर आहेत. कालावंताची कृती, क्रिया म्हणजे त्याने निर्माण केलेले कलाविश्व. प्रतिगामी कालबाह्य गोष्टींना समाज लवकर सोडत नाही. समाजाला यामुळे जे साचले पण येते. त्याला वाट मोकळी करुन द्यावी लागते. नवा आणि जुना विचार यांच्यामध्ये संघर्ष सुरु असताना त्याला योग्य भूमिका घ्यावी लागते. ज्या बळावर समाज उभा राहील, मृतप्राय झालेली समाज-रचना पुन्हा नव्या तेजाने, जोमाने उभी राहील ते स्पष्ट करावे लागते. या प्रकारच्या कार्याला कलावंत आपल्या दृष्टेपणाने आकार देत असतो. म्हणूनच कलावंत हा नेहमी दृष्टा विचारवंत, प्रज्ञावंतसर्जक असतो. तोच युगानुयुगे उभा राहून पिढ्यान-पिढ्यांना नव्या विचाराच्या धारणेसाठी तयार करत असतो.

समाज संस्कृतीचे पोषण भरण म्हणजे काय आणि टाकून देण्यासारखे काय हे समाजाला कळतेच असे नाही. अशावेळी निष्ठुरपणे समाजातील त्या भागावर प्रहार करुन कोणता भाग गळूसारखा अनावश्यक आहे हे आपल्या दृष्टेपणाने सांगणे हे कलावंताचे कार्य आहे. हे करीत असताना तो आपल्या सौंदर्यशीलतेने फारशी दुखापत न करता संयमाने करेल प्रसंगी बंडखोरपणाही करेल. त्याशिवाय कोणताही मार्ग नसेल. तो कलाकृती निर्माण करेल आणि त्यातूनच हे ध्येय साध्य करेल. कलाकृती निर्माण करणे ही त्याची बंडखोरीची क्रिया असेल. समाजमनाला त्यातील आशय आणि दृष्टी गरजेची वाटल्यामुळे समाज ते स्वीकार करेल. कारण त्याची कलाकृती म्हणजे समाज आणि संस्कृतीची गरज असेल. यातूनच समाजपरिवर्तनाची क्रिया घडत राहील. क्रांतीच्या मार्गावर जाण्यासाठी तो उत्क्रांतीची वाट परिणाम-कारकतेने दाखवेल. प्रसंगी त्याची किंमत त्याला मोजावी लागेल. तो कातडी बचाऊ धोरण स्विकारत नसेल. हे कृत्य म्हणजे त्याने घेतलेला वसा असेल. त्याच्या विवे-काने घेतलेला तो निर्णय असतो. चिरंतन मानवी महनीय मुल्यांच्या बाजूनेच कला-वंत उभा असतो. जे कालबाह्य असेल ते त्याच्या कलाकृतीमध्यें आपोआप नष्ट झालेले दिसेल.

कलावंताचे समाजाशी अतूट नाते असते. त्याची घडण समाजात राहून समाजाशी समांतर झालेली असते, एका अर्थाने तो आपल्या विवेकाशी बांधलेला असतो. तसाच तो समाजाशी बांधलेला असतो. कलावंताची सामाजिक बांधिल-कीही असतेच. गोंधळून टाकणाऱ्या सामाजिक आणि राजकीय अवस्थेमध्ये तसेच मूल्यहीनतेच्या भोवऱ्यात समाज गरगरत रहातो त्यावेळी नेमके मर्म शोधून कलावंत मार्ग दाखवतो.

कलावंत या बाबींची काळजी घेतो की मानवी समाजाच्या संवर्धनासाठी, प्रगतीसाठी घेतले जाणारे निर्णय हे शहाणपणाचे, तर्कसंगत तसेच मानवाला

कल्याणकारी मार्गावर आणणारे असतील. मानवीय मूल्यांना जीवन व्यवहारात मूर्त रुप येईल या विषयी कलावंत जागरुक असेल. हे व्यक्त करणाऱ्या त्याच्या कलेचे रुप सौंदर्यमय, अल्हादक आणि परिणामकारक असेल. त्याची कलाकृती मान–वाला सर्वंकश सत्याला जवळ नेणारी असेल. कलावंत आपले सौंदर्यपूर्ण कलाकृती निर्माण करुनच आपले ध्येय साधत असतो. आपलया कलाकृतीमधूनच तो आपली समाजविषयक प्रतिक्रिया देत असतो. प्रतिसाद देत असतो. कलावंत आपल्या कला–कृतीनीच मानव्याची सेवा करतो. मानव्याला नवनवीन पैलू पाडतो. हे पैलू मानवीय व्यवहाराला ज्ञानाचा प्रकाश देतात तत्कालीन प्रश्नांची सोडवणूक करुन मार्गदर्शन करतात.

धर्मनितीच्या सामाजिक क्षेत्रात निर्माण झालेल्या विविध गुंतागुंतीच्या संकल्–नाच्या चक्रव्युहामधून योग्य मार्ग काढून समाजाला कलावंत तारुन नेत असतो. झपा–टचाने होणारे औद्योगिकरण आणि यांत्रिकीकरण यामुळे मानवी संस्कृतीमध्ये कधी नव्हे ते विविध प्रश्न निर्माण झाले आहेत. आर्थिक यशाविषयीची प्रचंड आसक्ती तसेच निती मूल्यांच्या समर्पकतेविषयी तसेच भोगलोलुपतेच्या अमर्याद आकांक्षेविषयी उलट सुलट संकल्पनाचे चलन वलन समाज वर्तनात स्थिर होत आहे. यातून चिरं–तन नैतिक मूल्यांची दिशा दाखविणे स्थिर तत्त्वांचा आधार देऊन विविध कलात्मक रुप सिद्ध करणे हे कलावंतासाठी आव्हान असते. या औद्योगिकरणामुळे मानवी मूल्यांचे व्यापारीकरण होत चालले आहे. या बाजारु वर्तनाला समतोलाचे भान देणे ही सुद्धा कलावंताची सामाजिक जबाबदारी आहे.

आधुनिक जग झपाट्याने जवळ येत आहे. जागतिक बाजारपेठ आर्थिक समृद्धीची ग्वाही देत आहे. याचवेळी विविध संस्कृतीमधला माणूस एकत्र येत आहे. प्रत्येक मानवी समूहाचे जगण्याला असलेले नैतिक अधिष्ठान आणि विविध मूल्यां–विषयीचे आग्रक्रम वेगवेगळे असतात. अशा स्थितीत मूल्यभावांचा विविध संस्कृती–मध्ये संकर आणि अतिक्रमण होत असते. त्यामुळे समाजाला विविध प्रश्नांना तोंड द्यावे लागते. यातील प्रश्न गुंतागुंतीचे सामान्यांला संभ्रमात टाकणारे असू शकतात. सामान्य माणसाच्या जगण्याला मानवीय तत्त्वांचा आधार देणे त्याला अधिक नैसर्गिक करणे, नीतीचा आधार देणे, जुने जगणे नवे आक्रमण यात त्याला तोल देणे हे प्रज्ञा–वंत कालवंताचे कार्य असते. या स्थितीमध्ये त्याला संस्कारशील ठेवणे, संयमशीलतेचे महत्व जाणवून देऊन त्याला शहाणे करणे गरजेचे असते. नवनव्या घटकाच्या आक्रमणामुळे विखरुन जाणाऱ्या त्याच्या व्यक्तिमत्वाला सुघटित करणे त्याचा स्वाभाविक आकार त्याला देणे त्याच्या रुपाचे वास्तव त्याला दाखविणे यावेळी गर–जेचे असते. अशावेळी कलावंत दीपस्तंभासारखा मार्गदर्शन करत असतो. प्रज्ञावंत कलावंत आपल्या भूमिकेचे बीजारोपण समाजमनात करतो. कालावंत आपलेच

व्यक्तिमत्त्व समाजात विखरुन टाकतो. त्याच्या भूमिकेचे विस्तारण हस्तांतरण विकास होत रहातो. आणि यातून नकळत संमाजपरिवर्तन साधत रहाते. यासाठी त्याच्या भूमिकेला एक समाजहीत दक्षता, शहाणपणाचे चौफेर पैलू हवे असतात. असे असते म्हणूनच ती भूमिका समाजभर पसरते. या भूमिकेमागे त्याचे संपन्न व्यक्ति-मत्त्व, त्याचा विचार आणि कलागुण असतात. म्हणून ही भूमिका रम्य आणि स्वीकारणीय असते. समाजाला दृष्टेपण देते. असे त्याच्या भूमिकेचे सामाजिकरण होते. त्यातील कलापूर्णतेमुळे ती सौंदर्यात्मक अक्षय आणि संक्रमणाला सहज सोपी होते. ही कलावंताची भूमिका समाज नकळत स्वीकारतो. अनुरुपाने, मनरुपाने ती कलावंतचमय होतो. म्हणून जिथले कलावंत शहाणे तिथला समाज शहाणा हे समीकरण स्वाभाविक अवस्थेत खरे असते.

मानवाला नित्य जीवनातील अनुभवापेक्षा अधिक उदात्त अनुभव हवा असतो. अशी ओढ सर्वच मानवी समूहाना असते. हा वेगळा अनुभव त्याला दिव्यानुभव वाटतो. संताना हा अनुभव परतत्त्व स्पर्श करणारा वाटतो.

वाचे बरवे कवित्व  
कवित्वी बरवे रसिकत्व  
रसिकत्वी परतत्व  
स्पर्श जैसा

हा परतत्व स्पर्श सर्वांनाच लाभणें शक्य नसेलही पण नित्य जीवनानुभवापेक्षा अधिक उदात्त, उच्चतर अनुभवाचा स्पर्श कलावंत आपल्या कलाकृतीमधून देऊ शकतो. सर्व समाजासाठी हा अनुभव शक्य नसला तरी समाजाला अंतर्मुख करुन सदाचार, बंधुभाव; मानवता, साधेपणा, सत्याचरण ही तत्त्व अंगीकारणारा समाज निर्माण व्हावा यासाठी कलावंत प्रयत्नशील असतो. आणि समाजजीवनाची गती किमान त्या दिशेला वळेल असा प्रयत्न करतो.

एका धन्यतेच्या, कृतार्थतेच्या क्षणासाठी माणूस आसूसलेला असतो. त्या दिशेने त्याला कलानुभव नेत असतो. समाजमनाला आपल्या जीवनाची फलश्रुती कशात वाटावी तसेच त्याला उन्नत उदात्त जीवनमूल्याची आस वाटावी यासाठी कलावंत प्रयत्नशील असतो. मानवी जीवनाला समजून घेऊन त्याच्या अस्तित्वाचा वेगवेगळ्या संदर्भात अर्थ लावून सांगतो हे कलावंताचे कार्य असते. या अस्तित्वा-नुभवाचा अर्थ काय ? या आणि अशा जीवनाच्या मूलगामी प्रश्नांना कलाकृतीत स्थान देत त्याची रचना तो कलाकृतीत करत असतो.

मानवसमूहाला परिपूर्ण जीवनाचे आकलन करण्यासाठी साह्य करीत त्याला पूर्णानंदाच्या क्षणाकडे घेऊन जाणारा कलावंत असतो. जीवनाच्या एकूणच रहस्या-त्मकतेचा शोध घेत तिच्या गूढतेला स्पर्श करीत मानवी प्रज्ञा.जात असते. त्या प्रज्ञेला

मदत करणे, जीवनशोधाचा आनंद देणें हे कार्य कलाकृतीच्या माध्यमातून कलावंत
करत असतो. ही क्रिया कशी घडते याचे गणिती पद्धतीने उत्तर देता येत नाही.
म्हणून कलाकृती गणिती प्रमेयात मांडता येत नाही. कोणत्या मूल्यांसाठी मानवाने
जगावे आणि कशासाठी मरावे याचे साचेबंदपणे नसले तरी कलाकृती त्या दिशेकडे
निर्देश करते. समाजात जगत असताना मानवाला व्याप, ताप, दुःख सांभाळीत
मुक्तीचा आनंद कसा घ्यावा याचे दिग्दर्शन कलावंत करीत असतो. जीवनमुक्त
दशेविषयी कलावंत वेगवेगळ्या शक्यता दाखवित असतो. त्यातून मनाला वाट
सापडते. हा काही रहस्यमयतेचा भाग नाही. हा नित्यजीवनाचा भाग होऊन जातो.
औद्योगिकरणामुळे आर्थिक यश हेच जीवनमूल्य झाले आहे. सवंगता, बाजारुपणाने
मानवी जीवन व्यापले जात आहे. या जीवनालाच आपण श्रेष्ठतर जीवन समजून
जगतो आणि कधीतरी वैफल्यग्रस्त होतो. म्हणून आपल्याच जीवनाच शोध घेण्या–
साठी कलावंत मार्गदर्शन करतो. समृद्ध मानवी जीवन कोणते, सांस्कृतिक जीवन
कोणते याचे भान कलावंत देत असतो. मानवाला मनाच्या आत आणि जीवनाच्या
गाभ्यात डोकावून पहायला तो लावतो. जीवनाचा तलस्पर्शी अनुभव जीवनाला
कसा अर्थ देतो हे तो त्याला कलाकृतीद्वारे समजावून देतो. जीवनाच्या श्रेयसावर
आक्रमण करीत जाणारे पशुत्व, बाजारुपण यशाची सवंग जाणीव यांना नाकारण्याची
शक्ती मानवाला कलावंत देतो. कलावंत आपल्या कलाकृतीमध्ये अशी विविधांगी
प्रचंड शक्ती दडवून ठेवतो. ही बहुविध शक्ती मानवाला जगण्याचे बळ देते. म्हणून
आपण तिच्याविषयी भाषा गूढतेची वापरतो. कलाकृती मानवाला तिच्यात दड–
लेल्या जीवन रहस्याचा शोध घेण्याचा मोह पाडते. तिच्यात दडलेले कलापूर्ण जीवन–
रहस्याला शोधण्याचा प्रयत्न करतो. ही सततची प्रक्रिया आहे. आपल्याला शोध–
ण्यातील आनंद आणि शहाणपण देणारी सुबुद्धतेबरोबरच जीवनमुक्तीचा आनंद
देणारी हीच प्रक्रिया प्रत्येक श्रेष्ठ कलाकृतीमध्ये घडत असते. अशीच कलाकृती
कालातीत संस्कारशील म्हणूनच अजरामर होते. अक्षयपणे पिढान्‌पिढ्यांना आनंद
देते आणि त्यांची मूल्यांवर आधारलेली अभिरुची संपन्न करीत जाते. मूल्यांचा
जागर घालतें. अशा कलाकृतीची निर्मिती करणारा एक मानवच. एक कलावंत
त्याची भूमिका ही अशी सुबुद्ध, विवेकी, कलापूर्ण असते.

○○○

---

(पान ८४ वरुन)

पक्ष संघटनेत पदाधिकारी असणें वा त्यांच्या कार्यक्रमाला हजर रहाणें. या बाबी
करतात. त्यामुळे त्याचे सोबत असणाऱ्या कार्यकर्त्यात एक तर अशा 'विचारवंतां–
बद्दल' आकर्षण वाटत नाही, तसेच समाजात, संघटनेस त्यांचे समर्थन करता करता
नाकी नऊ येतात. त्यामुळे 'विचार व कृति' यात सम्यक व विवेकी अंतर असावे
लागते. थोडक्यात आज चळवळीसाठी "कृतिशील विचारवंतांची व विचारवंत
कार्यकर्त्यांची" गरज आहे. यात परस्पर पूरक प्रभाव असण्याची गरज आहे.

***

## संपादकाची अन्य प्रकाशने

- तरुण मनाच्या वाटा आणि वळणे
- भ्रष्टाचार : स्वरुप आणि संदर्भ
- आचार्य श. द. जावडेकर : साहित्य सूची
- न्याय म्हणजे काय ? ( संपा. )
- धर्मनिपेक्षता म्हणजे काय? संपा. )
- लोकशाही: स्वरुपव समस्या ( संपा. )
- समता : स्वरुप व समस्या (संपा. )
- गं. बा. सरदार : व्यक्ती व विचार (संपा. )
- डॉ. राधाकृष्णन् : व्यक्ति व विचार ( संपा. )
- पं. नेहरु : विचार दर्शन ( संपा. )
- ग्रामीण विकास : समस्या व उपाय ( संपा. )
- प्रौढ शिक्षण : एक राष्ट्रीय समस्या ( संपा. )
- समाज सुधारक म. फुले ( संपा. )
- मंडल अयोग : शोध आणि बोध ( संपा. )
- विश्लेशक तत्त्वज्ञान ( संपा.)
- डॉ. आंबेडकर : विचार दर्शन (संपा.)
- उदारमतवाद (संपा.)
- राजर्षी शाहू महाराज (संपा. )
- शाहीर आण्णाभाऊ साठे (संपा.)
- न्या. महादेव गोविंद रानडे (संपा.)
- बहुजन महासंघ : संकल्पना व सिद्धी (संपा.)
- शैक्षणिक समस्या व उपाय (संपा.)
- आचार्य शं. द. जावडेकर : विचारदर्शन (संपा.)
- भूकंप : एक नैसर्गिक आपत्ती (संपा.)
- सामाजिक चळवळी : काल, आज, उद्या ( संपा· )
- महर्षि विठ्ठल रामजी शिंदे : विचारदर्शन (संपादक)
- THE CONCEPT OF JUSTICE : BIBLIOGRAPHY



मूल्य ५५ रुपये